संगीत सामाजिक नाटक

# संत सखाराम

(अंक तीन)

वसंत सदाशिव दुदवडकर

[खोली पाहिजे, श्रीमंत, कुटुंब, संग्राम, सोन्याचा संसार, आजोबा, माझं लग्न, माझा गांव इत्यादि नाटकांचा कर्ता]

रामकृष्ण बुक डेपो,

गिरगांव *** मुंबई ४.

# संत सखाराम

या नाटकाचा पहिला प्रयोग " **कला सहकार** " या नाट्य-संस्थेनें रविवार तारीख २४–४–५५ रोजीं रात्रौ ८–३० वाजतां दामोदर हॉल, परळ, मुंबई येथें केला. त्या प्रयोगांत काम करणाऱ्या कलावंतांचा परिचयः—

| | |
|---|---|
| **सखाराम** ... ... ... | मुरारी शिवलकर |
| **लक्ष्मी** ... .. ... | शालिनी भालेकर |
| **विश्राम** ... ... ... | वसंत दुदवडकर |
| **विश्वनाथ** ... ... ... | भाई सावंत |
| **बाळाजी** ... ... ... | वसंत भोवर |
| **बाबा** ... ... ... | कृष्णकांत सकपाळ |
| **राजन** ... ... ... | राजन चव्हाण |
| **विमल** ... .... ... | सुमन नेमळेकर |
| **फौजदार** ... ... ... | पांडुरंग मेजारी |
| **निर्माता** ... ... ... | कृष्णकांत सकपाळ |
| **दिग्दर्शक** ... ... ... | भाई सावंत |
| **काव्य** ... .... ... | मुकुंदा विचारे |
| **संगीत** ... ... ... | शिवदास बावकर |

| | | | |
|---|---|---|---|
| हार्मोनियम ... | ... | ... | प्रभाकर पेडणेकर |
| तबला ... | ... | ... | पांडुरंग साळुंके |
| व्हायोलिन ... | ... | ... | रामभाऊ शिवडीकर |
| रंगभूषा ... | ... | ... | अनंत शिंदे |
| छाया ... | ... | ... | राजा मयेकर, [ गजानन फोटो स्टुडिओ, दादर ] |
| अध्यक्ष ... | ... | ... | रामचंद्र ठाणकर |
| सेक्रेटरी ... | ... | ... | बाळ महाडिक |
| स्टेज मॅनेजर | ... | ... | बाबुराव पवार |





दिग्दर्शक



संगीत दिग्दर्शक



कवी



निर्माता

# १

[ सखारामच्या घरांतील बैठकीची जागा. तिथं दोन खुर्च्या, एक आराम खुर्ची, भिंतीला लागून टेबल आणि टेबलाच्यावर भिंतीला सखारामच्या आईचा फोटो. दुसऱ्या बाजूला दोन–तीन कॅलेंडर्स. आंत–बाहेर जायला उजव्या बाजूच्या कोपऱ्याजवळ दरवाजा आहे. थोड्या वेळानं बाहेरून विमल येते. वय २१–२२ वर्षे. आधुनिक वेषभूषा. ती घरांत कुणी असल्याचा कानोसा घेत असतां आंत भांडें पडल्याचा आवाज ऐकू येतो. त्याबरोबर विमल हातांतील पुडा टेबलावर ठेवून बाहेर जाते. ]

**विमल :** ( थोड्या वेळानं ) घाला गऽऽऽबाई भिक्षा ! देव तुम्हांला सुखी ठेवील ! ( लक्ष्मी थोड्याशा फणकाऱ्यानंच बाहेर येते. वय २१–२२ वर्षे ).

**लक्ष्मी :** इथं कसली भीक मागायला आलीस ? पुढच्या घरीं जा ! काळ–वेळ कांहीं आहे कीं नाहीं ? देव सुखी ठेवील म्हणे ! त्या देवाच्या पायावर तूंच डोकं आपटून सुखी हो आधीं ! निघ इथून !

**विमल :** असं हो काय म्हणतां बाई ? तुमच्या पोरग्याला–नवऱ्याला देव उदंड आयुष्य देईल !

**लक्ष्मी :** तुझ्या पोरांना आणि नवऱ्याला उदंड आयुष्य मागून घे जा देवाजवळ ! चल जा !

**विमल :** भिक्षा घातल्याशिवाय मी इथून जाणारच नाहीं. भिक्षा वाढायला तांदूळ नसतील तर पैशांची भीक घाला बाई !

**लक्ष्मी :** पैशांची भीक पाहिजे तुला ? ( पदर खोवून फणकाऱ्यानं बाहेर जात असतां ) देतें हं—( विमल आंत येते. )

**विमल** : ( हंसत हात पुढं करीत ) दे !

**लक्ष्मी** : ( आश्चर्यानं ) विमल ! तूं ?

**विमल** : लक्ष्मी ! ( हंसत दोघी एकमेकांना बिलगतात.)

**लक्ष्मी** : कधीं आलीस मुंबईहून ?

**विमल** : आजच–सकाळच्या बोटीनं !

**लक्ष्मी** : काय ग, लग्न झाल्यानंतर तीन वर्षांनीं इथं आलीस, ती चांगलं हंसत–खिदळत मला हांक मारीत यायचं, तें सोडून, भीक मागत आलीस अवदेस ! ( विमलच्या पाठीवर प्रेमानं रपाटा मारते. ती हंसते.) हंसतेस काय आणखी ! ( जास्त हंसते. ) लग्न झालं तरी पूर्वींचा वात्रटपणा कांहीं गेला नाहीं तुझा !

**विमल** : मी पूर्वींसारखीच आहें. पण तूं मात्र लग्न झाल्यावर अगदीं कडकलक्ष्मी बनून गेलीस. काय पण गुरगुरून अंगावर येत होतीस ! ( लक्ष्मीची नक्कल करीत ) पैशांची भीक पाहिजे तुला ? देतें हं ! ( दोघी हंसतात ) काय ग, भिकाऱ्यावर इतकी कधींपासून चिडूं लागलीस ?

**लक्ष्मी** : चिडेन नाहीं तर काय ! दारीं भीक मागायला येतात ते येतात आणि उगाच भलतेसलते आशिर्वाद देत राहातात.

**विमल** : लग्नाअगोदर नव्हतीस अशी चिडत कधीं ! दुपारच्या वेळीं एखादा भिकारी येऊन,' तुला चांगला नवरा मिळेल ग मुली,' असं म्हणाला, कीं पुढ्यांतलं जेवणाचं ताट नेऊन त्याला वाढायचीस. घरांतलीं सगळीं माणसं कौतुक करायचीं तुझं ! मला सुद्धां केवढा अभिमान वाटायचा तुझा त्यावेळीं !

**लक्ष्मी** : त्यावेळीं ! आणि आतां नाहीं वाटत ग ?

**विमल** : तोंडानं कसं सांगूं लक्ष्मी तुला ? मुंबईला माझ्या पुष्कळ मैत्रिणी आहेत, पण ती नुसती दिखाऊ मैत्री ! मनाचा मोठेपणा तुझ्याएवढा मला कुठल्याहि मैत्रिणींत दिसला नाहीं.

**लक्ष्मी** : मला विसरली नाहींस तर तूं !

**विमल :** कशी विसरेन ग तुला ? दोन दिवसांची ओळख होती का ती विसरायला ? याच गांवांत आपण लहानाची मोठीं झालों. एकत्र खेळलों, शिकलों, एकमेकांच्या सुखदुःखाशीं समरस झालों. मोठेपणीं बाबा मला मुंबईला घेऊन गेले. मी मुंबईला जायच्या एकदोन दिवस अगोदर किती धडपड चालली होती तुझी !

**लक्ष्मी :** कसली धडपड चालली होती माझी ?

**विमल :** कसली ? अग लाडू काय केलेस, काजूचे गर किती दिलेस आणि जातांना बोटींत खायला भाजी पुरी करून दिलीस ! बोट लागूं नये म्हणून लिंबू–सुपारी सुद्धां दिलीस. ' जपून जा, प्रकृतीला सांभाळ, पत्र पाठव'–किती किती मायेनं सांगितलंस. त्यावेळीं मला वाटलं–

**लक्ष्मी :** काय ?

**विमल :** माझी मैत्रीण मला हें सांगत नसून, माझी आईच मला हें सांगत आहे असं मला वाटलं. आणि निघतांना माझ्या खांद्यावर दोन्हीं हात ठेऊन, ' विमल ' ! असं तोंडांतल्या तोंडांत बोललीस ! शब्द सुद्धां तुझ्या तोंडांतून बाहेर आले नाहींत. पण त्याचवेळीं तुझ्या डोळ्यांतून आंसवांचा पूर वहात होता. आजुबाजुचीं सगळीं माणसं आपल्याकडे भरल्या डोळ्यांनीं पहात होतीं. कशी आमची समजूत करावी हें त्यांना समजत नव्हतं. एवढ्यांत माझे बाबा पुढं आले आणि म्हणाले, ' लक्ष्मी, विमल कायमची थोडीच मुंबईला राहाणार ? येईल थोड्या दिवसांनीं. हांस पाहूं लक्ष्मी ! रडतेस काय पोरासारखी ! आणि खरोखरच तूं एखाद्या लहान पोरासारखी मोठ्यानं रडूं लागलीस. ( लक्ष्मी त्या आठवणीनं भारावून हंसते. ) तुझ्यापासून कधींहि दूर जाऊं नये असं मला वाटलं. पण तेवढ्यांत बाबा जवळ–जवळ ओढीतच मला घेऊन गेले. ' लक्ष्मी, लक्ष्मी ' अशा मी हांका मारल्या पण तूं त्यावेळीं एकसारखी रडत होतीस. बोटींत तुझी मला सारखी आठवण होत होती. तुझं बोलणं, जातांना डोळ्यांत प्राण आणून तू मारलेली " विमल " ! ही हांक ! कांहीं कांहीं मला सुचूं देत नव्हती. मी पाठविलेल्या पत्रांत तसं लिहिलं होतं ना तुला ? तूं मला तसं कां पत्र पाठवलं नाहींस ? नुसती खुशाल आहें एवढंच पत्रांत लिहिलंस.

**लक्ष्मी :** तूं तसं पत्रांत लिहिलंस पण मला तसं पत्रांत लिहितां आलं नाहीं, इतकं माझं मन भारावून गेलं होतं. कुणालाहि न सांगतां अचानक मुंबईला येऊन तुला भेटावं असं किती वेळां वाटलं मला !

**विमल :** मग कां आली नाहींस ? माझ्या लग्नाच्या वेळीं, कसंहि करून येच असं तुला पत्र पाठवलं होतं. यायचं नाहीं तूं ?

**लक्ष्मी :** येण्यासाठीं माझी सारखी धडपड चालली होती. बाबांना सुद्धां सांगितलं. पण कांहीं उपयोग झाला नाहीं.

**विमल :** किती किती वाट पाहिली मी तुझी ! लग्नाच्या वेळीं तूं जवळ असावीस असं मला सारखं वाटायचं.

**लक्ष्मी :** तेव्हां तसं वाटायचं पण लग्नानंतर वर्षभर एक पत्रही पाठविलं नाहींस, तेव्हांच मी समजलें—या गरीब लक्ष्मीला माझी विमल विसरली.

**विमल :** नाहीं ग, तुला विसरलें, नाहीं आणि विसरणारहि नाहीं. ( कसं सांगावं या विचारानं लाजून ) हंसणार नाहींस ना तूं ?

**लक्ष्मी :** कशाला ? काय झालंय ?

**विमल :** लग्न झाल्यावर असं कांहीं मला त्यांनीं भारून टाकलं !

**लक्ष्मी :** ( आश्चर्यानं हंसत ) म्हणजे ? गारुडी कीं जादुगार आहेत तुझे नवरदेव ?

**विमल :** थट्टा करूं नकोस ग ! खरोखरच माझे राजन जादुगार आहेत. अशी कांहीं त्यांनीं माझ्यावर प्रेमाच्या जादूची मोहिनी घातली कीं मी अगदीं पुरती वेडी होऊन गेलें. त्यांच्याशिवाय मला दुसरं कांहींच सुचेना. टॅक्सींतून फिरायला काय न्यायचे ! सिनेमा किती दाखवायचे ! गायचे काय !

**लक्ष्मी :** गातातसुद्धां का ?

**विमल :** किती गोड आवाज आहे त्यांचा ! नाटकांतहि कामं करतात. रेडिओवरहि गातात. माझ्यावर कविता करून मलाच ती गाऊन दाखवायचे. मित्र-मंडळींना पार्ट्या काय द्यायचे. त्यांच्या हास्यविनोदांत मी इतकी लाजून

जायची, कीं ते जास्तच हंसायचे. चांदण्या रात्रीं मला फिरायला न्यायचे आणि कित्ती–कित्ती खट्याळपणें बोलायचे ! इथं आले कीं पाहशीलच आतां !

**लक्ष्मी :** इथं येणार आहेत आतां ?

**विमल ;** हो ! अग फोटो किती काढलेत आम्ही दोघांचे. मी नको नको म्हणत असतांनाहि पंजाबी ड्रेसमध्यें माझा फोटो काढलाय त्यांनीं. माझ्या अनिलचा तर त्यांनीं पाठीवर घेऊन फोटो काढलाय. फोटोग्राफर सुद्धां पोट धरून हंसत होता. खोली भरून गेलीय फोटोनीं. तूं नाहीं काढलास तुझ्या नवऱ्याबरोबर फोटो ? तुमचा दोघांचा इथं एकहि फोटो दिसत नाहीं. ( लक्ष्मीच्या जवळ जाऊन ) कां काढला नाहींत दोघांचा फोटो ? ( आश्चर्यानं ) लक्ष्मी, डोळ्यांत पाणी कां आलं तुझ्या ? हेवा वाटला माझा तुला ?

**लक्ष्मी :** नाहीं ग विमल ! खूप खूप समाधान वाटलं मला ! तूं संसारांत सुखी आहेस हें ऐकून आनंदानं अश्रू आले माझ्या डोळ्यांतून ! असाच सुखानं संसार कर !

**विमल :** आजीबाईसारखा आशिर्वाद देते आहेस मला ! तूं संसारांत सुखी नाहींस वाटतं ?

**लक्ष्मी :** ( अडखळत ) मी ?. कुणी–कुणी सांगितलं तुला मी संसारांत सुखी नाहीं म्हणून ? मी सुखी आहें, खूप–खूप सुखी आहें ग !

**विमल :** मग तुम्ही दोघांनीं साधा फोटोहि कां काढला नाहीं ? तूं सांगायचं नाहींस त्यांना, आपण दोघांनीं फोटो काढूं या म्हणून ?

**लक्ष्मी :** ( जास्त अडखळत ) मी – मी कशी सांगूं ?

**विमल :** कधीं फिरायला गेली होतीस त्यांच्याबरोबर ?

**लक्ष्मी :** इथं – इथं गांवांत काय फिरायचं !

**विमल :** मनमोकळेपणानं कधीं बोलत बसतां तुम्हीं ?

**लक्ष्मी :** आम्हीं ना, अग खूप–खूप बोलत बसतों.

**विमल :** खोटं–सगळं खोटं !

**लक्ष्मी :** नाहीं ग अगदीं खरं सांगतेय. मी अगदीं सुखांत आहें–आनंदांत आहें.

**विमल :** आनंदाच्या गोष्टी अशा रडव्या तोंडानं सांगतात वाटतं ?

**लक्ष्मी :** ( निर्जीवपणें हंसत ) कुठं रडतेय मी ? हंसत बोलतेंय–आनंदानं बोलतेंय–मी सुखी आहें.

**विमल :** सगळ्या गोष्टी मनमोकळेपणानं मला सांगणारी तूं, आज माझ्याजवळ लपवाछपवी करतेस – मला फसवतेस तूं लक्ष्मी !

**लक्ष्मी :** नाहीं ग, तुझ्याजवळ कशाला खोटं बोलेन ? कशाला फसवीन तुला ?

**विमल :** मला सगळं कांहीं समजलंय !

**लक्ष्मी :** ( बावरून ) काय ?

**विमल :** तुझं मनाविरुद्ध लग्न झालंय !

**लक्ष्मी :** नाहीं – नाहीं !

**विमल :** अजून खोटं बोलतेस तूं लक्ष्मी ? सखाराम नांवाच्या चाळिशी उलटून गेलेल्या दुसरेपणाच्या नवऱ्याशीं लग्न झालं तुझं ! त्यांच्याशीं लग्न करायला आनंदानं तूं कबूल झालीस ?

**लक्ष्मी :** होय ! आनंदानं मी तयार झालें. मी संसारांत सुखी आहें.

**विमल :** तूं पूर्वींचीच लक्ष्मी आहेस का ? मी विश्रामशींच लग्न करणार म्हणून मला सांगणारी तूंच का ती लक्ष्मी ?

**लक्ष्मी :** ( तिरस्कारानं ) नांव घेऊं नकोस त्याचं माझ्यासमोर !

**विमल :** कां ? कां नांव घेऊं नकोस ? विश्राम काय वाईट होता ? तुझा नि त्याचा जोडा किती सुंदर दिसला असता, कशाला त्याच्यावर प्रेम करून त्याला फसवलंस ?

**लक्ष्मी :** मी त्याला फसवलं नाहीं. विश्रामनंच मला फसवलं !

**विमल** : विश्रामनं तुला फसवलं ? कां ? कुठंय विश्राम ?

**लक्ष्मी** : तुरुंगांत !

**विमल** : काय केलं त्यानं ?

**लक्ष्मी** : चोरी केली. सोन्यामोत्याची पेटी फोडून पळतांना पकडला गेला तो !

**विमल** : पण कां चोरी केली त्यानं ?

**लक्ष्मी** : मला माहीत नाहीं. असल्या माणसाशीं मी लग्न केलं असतं तर तुला आनंद झाला असता ?

**विमल** : मला हें माहीत नव्हतं. पण विश्रामनं कां चोरी केली तें तूं समजून घ्यायला पाहिजे होतंस. मला माहीत आहे, विश्राम सज्जन होता. अशी कशी चूक केली त्यानं ? तो सुटेपर्यंत वाट पाहायला पाहिजे होतीस तूं !

**लक्ष्मी** : कशाला वाट पाहायला पाहिजे होती ? कशाला विचारायला पाहिजे होतं ?

**विमल** : तुझं त्याच्यावर प्रेम नव्हतं ?

**लक्ष्मी** : प्रेम ! पण सारा गांव, विश्राम चोर–दरोडेखोर––बदमाष म्हणून ओरडत होता. काय मनाला येईल तें बोलून हिणवीत होता. मला तें असह्य झालं. विश्रामविषयींच्या माझ्या चांगल्या भावना नष्ट झाल्या. विश्रामचा मला तिरस्कार–भयंकर तिरस्कार वाटूं लागला. या जन्मांत त्याचं कधीं तोंड पहायचं नाहीं असं मी ठरवलं !

**विमल** : आणि त्या तिरस्काराच्या भरांत चाळिशी उलटून गेलेल्या तरुणाशीं तूं मोठ्या आनंदानं लग्न केलंस !

**लक्ष्मी** : ( बावरून ) विमल !

**विमल** : लग्नांत इतकी आनंदांत होतीस म्हणूनच माझं लग्न आहे असं पत्र पाठवायला विसरलीस, नाहीं ? अग पत्र पाठवलं असतंस तर तुझा तो लग्नसोहळा पाहायला धांवत आलें असतें मी लक्ष्मी ! तूं आनंदानं लाजत–

लाजत बोहल्यावर उभी राहून, हृदयांत न मावणाऱ्या आनंदानं नवऱ्याला माळ घालते आहेस तें पाहून माझ्या डोळ्याचं पारणं फिटलं असतं. आनंदानं रडलें असतें मी तुझ्याकडे पाहून! कां बोलावलं नाहींस मला? सांग, कां बोलवलं नाहींस?

**लक्ष्मी :** (हुंदका आवरीत) कां बोलावलं नाहीं! कुठल्या तोंडानं मी तुला बोलावणार होतें? विमल, माझा लग्नसोहळा नव्हता तो, या तुझ्या लक्ष्मीच्या प्रेताचा अंत्यसोहळा होता तो! मी सुखी आहें असं तुला सांगितलं. आयुष्यांत पहिल्यानंच तुझ्याशीं मी खोटं बोललें. मी सुखी नाहीं विमल, मी सुखी नाहीं! मी कशासाठीं आणि कुणासाठीं जिवंत आहें तें माझं मलाच कळत नाहीं.

**विमल :** आतां या घराच्या उंबरठ्यावर डोकं आपटून आयुष्यभर रडत राहिलीस म्हणून कोण ऐकणार आहे तुझं रडणं? लग्नाअगोदर विरोध कां केला नाहींस? विश्रामचा तुला तिरस्कार वाटत होता, तर दुसऱ्या कुठल्या तरी तरुणाशीं माझं लग्न करा म्हणून बाबांजवळ हट्ट कां केला नाहींस?

**लक्ष्मी :** हट्ट! बाबांना रडून–ओरडून कितीदां मी सांगितलं, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. माझ्या आणि विश्रामच्या नांवाचा बोभाटा झाला होता. माझ्याशीं लग्न करायला गांवांत कुणीही तयार होईना. म्हणून शेवटीं बाजारांत जनावर विकातं तसं सर्वांनीं लग्नाच्या नांवानं हा दोर माझ्या गळ्यांत बांधून, एक जनावर या घराच्या गोठ्यांत आणून बांधलें. हेंच तें मंगल मंगळसूत्र! माझा कांहीं अपराध नसतांना सर्वांनीं माझ्यावर सूड घेतला ग विमल, माझ्यावर सूड घेतला.

**विमल :** (लक्ष्मीच्या जवळ जाऊन भारावलेल्या आवाजांत) लक्ष्मी!

**लक्ष्मी :** (दुःख आवरीत) इतक्या दिवसांनीं तूं इथं आलीस; तुझ्याशीं चार आनंदाच्या गोष्टी करायच्या तें सोडून वेड्यासारखी माझीच रडकथा सांगतेंय तुला! थांब, चहा करून देतें हं तुला!

**विमल :** (टेबलावरचा पुडा घेऊन) ही बघ भेट आणलीय तुम्हांला!

**लक्ष्मी :** तुम्हांला?

**विमल :** हो ! तुम्हां दोघांना, एकटीला नाहीं. (लक्ष्मी भेट घेऊन घरांत जाते. ती गेली तिकडे निराशेनें पहात)

फुलायचा फुलबाग जिथें
पेटला वणवा तिथें
यायची पुनव जिथें
रात काळी ये तिथें
दिसायचें मंदीर जिथें
भंगल्या मूर्ति तिथें!

[ गाणं संपल्यावर राजन येतो. त्यानं आधुनिक वेशभूषा केली आहे. ]

**राजन :** (हंसत) काय राणीसरकार! गप्प कां ?

**विमल :** (गंभीरपणें) राज्य दुसऱ्याचं असल्यामुळं ही आपली राणी गप्प आहे आणि राजकुमारानं सुद्धां हें दुसऱ्याचं राज्य असल्यामुळं आपल्या राज्यासारखा उल्लूपणा इथं न करण्याची खबरदारी घ्यावी.

**राजन :** (कृत्रिम गंभीरपणें) राजपुत्राचं तरुण वय आणि स्नो–पावडर लावल्यावर बऱ्याच सुंदर दिसणाऱ्या राजकन्येशीं राजपुत्राचं नुकतंच लग्न झाल्यामुळं, तो कुठंहि आपलंच राज्य समजून उल्लूपणा आणि थोडासा टारगटपणा करतो हें राणीसरकारला माहीत असतां आम्हाला गंभीरपणानं वागण्यचा इशारा देण्यांत यावा हा आमचा केवढा दैवदुर्विलास! म्हणून म्हणतों (हात धरून) माय डिअर विमल–विमले !

**विमल :** काय करतां हें राजन ?

**राजन :** कुठं काय केलं ? हात धरलाय मी तुझा ! पण तूं जणूं कांहीं मुंडी मुरगाळल्यासारखी धडपडतेस.

**विमल :** बाहेर आपल्या बायकोशीं कसं वागावं हें तुम्हांला अजून कसं समजत नाहीं ?

**राजन :** आणखी कसं वागायचं ? आपल्या बायकोचा हात धरायचा नाहीं तर काय शेजाऱ्याच्या बायकोचा हात धरायचा ?

**विमल :** अहो पण हें दुसऱ्याचं घर आहे ! जरा सभ्यपणानं वागा !

**राजन :** बायकोजवळ कसला सभ्यपणा ! उठल्या–बसल्या बायकोशीं सभ्य-पणानं वागणाऱ्या नवऱ्यावर भोटमामा असा शिक्का मारला जातो. आपल्याला नाहीं तें जमायचं. आपल्या बायकोशीं कुठंहि खिलाडूपणानं वागणारा मी माणूस आहें !

**विमल :** तशा माणसांत गेल्यावर तसं वागणं चालून जाईल. पण इथं तो तुमचा खिलाडूपणा जरा वेळ बाजूला ठेवा. माझ्या मैत्रिणीला नाहीं तसं वागणं आवडायचं.

**राजन :** मग कसं वागणं आवडेल ?

**विमल :** माझ्यापासून दूर अंतरावर अगदीं सभ्यपणानं बसा !

**राजन :** सभ्यपणानं बसूं ? ( थोडा विचार करून ) काय ग, तुझी मैत्रीण म्हातारी आहे कीं काय ?

**विमल :** अहो जरा हळूं बोला ! आंत ऐकूं जाईल तिला ! माझ्याच वयाची आहे ती ! पहिल्यानं तुम्ही बसा पाहूं !

**राजन :** सभ्यपणानं बसूं ?

**विमल :** हो – हो !

**राजन :** हा बघ बसलों.

**विमल :** ( हंसूं आवरीत ) असे बावळटाप्रमाणं काय बसलांत ?

**राजन :** छे छे ! सभ्य माणसाप्रमाणं बसलेंय !

**विमल :** असं हें तुमचं ध्यान पाहून माझी मैत्रीण मला हंसेल.

**राजन :** अस्सं ? मग स्टायलिस्ट– ॲक्टरसारखा बसतों. ( झटकन् सिगा-रेट पेटवून ओव्हर ॲक्शनमध्यें एक भुवई उंचवून ताठ बसतो. )

**विमल :** ( हंसत ) असे कार्टुनसारखे काय बसलांत.

**राजन** : अरे! सभ्य माणसारखं बसायचं नाहीं—स्टायलिस्ट बसायचं नाहीं मग बसायचं तरी कसं ?

**विमल** : माणसासारखे बसा. तुमची स्टाईल जाऊं दे खड्डयांत यावेळीं! आणि माझ्या मैत्रिणीची ओळख करून देतांना शेकहँड करायला धावूं नका. लांबून नुसतं " नमस्ते ! " म्हणा !

**राजन** : (गंभीरपणें) तें तुझ्या मैत्रीणीच्या चेहेऱ्यावर अवलंबून राहील.

**विमल** : आणि अचकट—विचकट विनोद करून उगाच हॅं हॅं करून हसूं नका. तुम्हाला आगाऊपणा करायची फार वाईट खोड आहे म्हणून सांगून ठेवतें. नाहींतर ती मनांत म्हणायची, हिचा नवरा म्हणजे आपला असा तसाच आहे.

**राजन** : (थोड्या रागानें) असा तसा म्हणजे? अं? असा तसा म्हणजे कसा? अरे वा! तुझी मैत्रीण अशी कोण लागून गेलीय ?

**विमल** : अहो, हळूं बोला !

**राजन** : कां? मोठ्यानं बोलायची कुणाची चोरी आहे कीं काय? असा तसा म्हणजे कसा? मला कळलं पाहिजे.

**विमल** : जरा हळू बोला! तुम्ही फार चांगले आहांत. पाया पडतें मी तुमच्या !

**राजन** : तोंडानं नको! पड, —पड पाया पड! असा तसा म्हणजे काय, मी वाटेसर पडलोंय कीं काय? म्हण, चूक झाली—मला क्षमा करा!

**विमल** : (पाया पडत) माझी चूक झाली. मला क्षमा करा.

**राजन** : (गंभीरपणें) शरणांगताला अभय असो! (इतक्यांत चहा घेऊन लक्ष्मी येते.)

**लक्ष्मी** : (आश्चर्यानं) विमल, हें ग काय?

**विमल** : (लाजून अडखळत) कुठं—कुठं काय!

**राजन** : अहो, हा हिचा बावळटपणा—मूर्खपणा दुसरं काय! उठल्या—सुटल्या अशीच माझ्या पाया पडते. मी हिला किती वेळां सांगितलं, बायकोनां

नवऱ्याच्या कधींहि पाया पडूं नये. तो इतरासारखाच मूर्ख–बेअकली–अक्कल-शून्य प्राणी असतो. पण ही कुठं ऐकतेय? मी म्हणजे हिला, सत्यवान–रामासारखा सत्यवचनी–एकपत्नी नवरा वाटतों. अहो, मी जर स्त्री असतों, तर नवऱ्याच्या पाया पडणं दूरच राहिलं असतं, कान धरून रोज माझ्या समोर शंभर उठा–बशा काढायला लावल्या असत्या. (लक्ष्मी–विमल हंसतात.) हंसता काय? हिच्यासारखा नवऱ्याच्या पाया पडत राहिलों नसतों.

**लक्ष्मी :** जाऊं द्या ! तशीच आज्ञाधारक आहे ती ! चहा घ्या ! ( विमल कप घेते. )

**राजन :** एकच कप चहा ?

**लक्ष्मी :** आणतें ना आणखी !

**विमल :** ( कप स्टुलावर ठेवते. ) ऐकलंस का लक्ष्मी, हे माझे राजन !

[ राजन शेकहॅन्ड करायला झटकन् पुढं होतो. पण विमल लक्ष्मीला दिसणार नाहीं अशा बाजूनं राजनच्या हाताला कडकडून चिमटा घेते. त्याबरोबर राजन कळ दाबून पण ओशाळून हंसत. ]

**राजन :** नमस्ते !

**लक्ष्मी :** नमस्ते !

**राजन :** आणि या आमच्या सौभाग्यवती विमलाबाई ! ( विमल आणि लक्ष्मी हंसत एकमेकांना नमस्कार करतात. )

**लक्ष्मी :** चहा घेऊन येतें हं ! ( घरांत जाते. )

**राजन :** ( हात चोळीत ) काय ग, केवढ्या मोठ्यानं चिमटा काढलास.

**विमल :** तुम्हांला सांगितलं होतं ना शेकहॅन्ड करायला जायचं नाहीं म्हणून ?

**राजन :** रुबाबदार माणसानांच मी शेकहॅन्ड करतों, अगदीं साफ मनानं त्यांची मैत्री ठेवतों. ए, मला वाटलं होतं, तुझी मैत्रिण म्हणजे काय–असेल ! पण नाहीं, ठीक आहे. काय ग, हिचा नवरा कसा काय आहे ?

**विमल** : चांगला आहे !

**राजन** : जगांतले नव्याणव टक्के नवरे तसे चांगलेच असतात. पण दिसायला कसा काय आहे ? माझ्यासारखा मस्त–सुंदर ?

**विमल** : तुम्हीं सुंदर आहांत ?

**राजन** : तुझ्यापेक्षां दसपटीनं सुंदर आहें.

**विमल** : गोरे आहांत म्हणून सुंदर समजतां कीं काय ?

**राजन** : अग जा ! कुठल्याहि अँगलनं मी सुंदर दिसतों. माझे मित्र मला नेहमीं म्हणतात...

**विमल** : काय म्हणतात ?

**राजन** : काय राजन, कसल्या फडतूस मुलीशीं लग्न केलंत तुम्हीं ! तुम्हांला दुसरी कोणी मिळत नव्हती म्हणून तुम्ही अशातशा मुलीशीं लग्न केलंत कीं काय ?

**विमल** : ( रागानं ) अशा–तशा म्हणजे ? अं ? अशा–तशा म्हणजे कशा ? अरे वा ! तुमचे मित्र असे कोण लागून गेलेत ?

**राजन** : ( आर्जवानं ) तसं नाहीं !

**विमल** : तसं नाहीं म्हणजे ?

**राजन** : अग जरा हळू बोल ?

**विमल** : कां ? मोठ्यानं बोलायला कुणाची चोरी आहे कीं काय ? अशी–तशी म्हणजे कशी ? मला कळलं पाहिजे !

**राजन** : अग जरा हळू बोल ! तूं फार चांगली आहेस. माझ्यापेक्षां सुंदर आहेस.

**विमल** : पण अशी–तशी म्हणजे कशी ? ( मोठ्यानं ) सांगा ना.

**राजन** : हळूं बोल, हळूं बोल ! वाटल्यास मी तुझ्या पाया पडतों.

**विमल** : तोंडानं नको ! पडा, पाया पडा ! अशी तशी म्हणजे काय, मी वाटेवर पडलें होतें कीं काय ? म्हणा चूक झाली, मला क्षमा कर !

**राजन** : माझी चूक झाली, मला क्षमा कर.

**विमल**—खालीं वाकून म्हणा ! म्हणा ! ! अरे वा ! अशी तशी काय ?

**राजन**—( पायाजवळ खालीं वांकून नाईलाजनं ) तुझी चूक झाली. मला क्षमा कर.

**विमल** : काय म्हणालांत ?

**राजन** : माझी चूक झाली, मला क्षमा कर. ( लक्ष्मी चहा घेऊन येते. )

**विमल** : शरणांगतानं हा चहा पिऊन तरतरीत व्हावं ! ( कप देते )

**लक्ष्मी** : हें हो काय ?

**राजन** : ( ओशाळून ) कुठं ? कुठं काय ?

**विमल** : अग हा यांचा बावळटपणा, मूर्खपणा, दुसरं काय ! उठल्या-बसल्या असेच माझ्या पाया पडत असतात. मी यांना किती वेळां सांगितलं, नवऱ्यानं बायकोच्या कधींहि पाया पडूं नये. बायको हा इतर स्त्रियांसारखाच मूर्ख—बेअकली—अक्कलशून्य प्राणी असतो. पण हे कुठं ऐकताहेत. मी म्हणजे यांना सावित्री-सीतेसारखी पतीच्या आज्ञेंत राहणारी बायको वाटते. ऐकलंत का ? तुमच्या जागीं मी असतें, तर बायकोला उठतां—बसतां पाया पडायला लावलं असतं, कान धरून रोज हजार उठबशा काढायला लावल्या असत्या. ( लक्ष्मी हंसते ) हंसतेस काय ? यांच्यासारखी बायकोच्या पाया पडत राहिलें नसतें.

**लक्ष्मी** : चहा घे आधीं तूं ! बसा ना तुम्ही !

**राजन** : ( बसून ) पाहिलंत वहिनी, आमची मंडळी किती हुशार आहे. ती ! मघाशीं मी हिला शेंडी लावली होती. तीच काढून हिनं आतां मला लावली.

**विमल** : अहो. लोकांनीं तुम्हाला इतक्या शेंड्या लावल्यात, आतां शेंडी लावायला तुमच्या डोक्यावर जागाच राहिली नाहीं.

**लक्ष्मी** : म्हणजे ?

**विमल :** अग कुणीहि येऊन यांना बनवून जावं. दोन महिन्यापूर्वी यांना एक माणूस पंचवीस रुपयांना टोपी घालून गेला. आठ दिवसांनीं येतों म्हणाला होता. पण पत्ताच नाहीं त्याचा त्यानंतर !

**राजन :** त्याचं असं आहे. मी आहें जरा हळव्या मनाचा—म्हणजे भावना-प्रधान ! कुणी येऊन रडला, कीं मी अगदीं वितळून जातों. वाटतं आपल्या हातून होईल ती मदत दुसऱ्याला करावी. सखारामभाऊचा स्वभाव कसा आहे ? माझ्यासारखाच आहे ना ?

**लक्ष्मी :** ( अडखळत ) हो—हो अगदीं तुमच्यासारखाच !

**राजन :** माझ्यासारखेच अपटुडेट राहतात ना ?

**लक्ष्मी :** हो हो !

**राजन :** वाटलंच मला ! त्यांची आणि माझी चांगलीच मैत्री जमेल ! कुठं गेलेत ? केव्हां येणार आहेत ?

**लक्ष्मी :** अप्पा सावकाराच्या पेढीवर कामाला असतात. संध्याकाळीं येतात.

**राजन :** अस्सं अस्सं ! फोटोही कुठं दिसत नाहीं त्यांचा ! काय हो, फोटो नाहीं काढायचा तुम्ही ? आम्ही दोघांनीं किती फोटो काढलेत !

**विमल :** मुंबईसारखे इथं कुठं आहेत चांगले फोटोग्राफर ! म्हणून नाहीं काढला फोटो. नाहीं ग ?

**लक्ष्मी :** हो हो ! (विषय बदलण्याच्या उद्देशानं) काय ग विमल, तूं सांगत होतीस ना हे रेडिओवर गातात म्हणून ?

**राजन :** (दिमाखानं ) गातों ! अहो मी ऑल इंडिया रेडिओवर गाऊं लागलों, कीं घरोघरचे रेडिओ नागासारखे डोलतात म्हणे ! मग ऐकणाऱ्या माणसांची काय अवस्था होत असेल त्याची कल्पनाच करा !

**लक्ष्मी :** आम्हांला कसं समजणार ? आम्ही कुठं ऐकलंय तुमचं गाणं ?

**राजन :** तुम्ही माझं गाणं ऐकलं नाहीं ?

**विमल :** अहो, शहरांत रेडिओ आहेत. इकडे कुठं रेडिओ ?

**लक्ष्मी** : म्हणा तरी एखादं गाणं ! तेवढंच ऐकून समाधान !

**राजन** : म्हणूंच तर ? तें माझं पेटंट भावगीत म्हणतों. ऐका हं !

लाजते, प्रीत नयनांत
गुंजते, गीत कानांत
थय्थय् नाचत ये मधुवंती
गात गोड, लहरे रसवंती
मंद मधुर दरवळे गंध,
नवजीवन ये रंगांत
पदराआडुनी पहाते
मंत्रमुग्ध होऊनी रहाते
ढगामागुनी रोहिणी कां,
लाजे आकाशांत ?

**राजन** : ऐकलंत गाणं ? कसं वाटलं ?

**लक्ष्मी** : फार छान गातां हं तुम्हीं !

**राजन** : आतां हिला विचारा !

**लक्ष्मी** : तुला आवडलं ?

**विमल** : अग हें रोजचंच रडगाणं आहे यांचं. त्यांत काय आवडायचं मला ?

**राजन** : ऐकलंत ? सगळे लोक माझं कौतुक करतात. म्हणतात, काय आवाज आहे राजन तुमचा ! काय फिरत आहे गळ्याला ! पण ही, नेहमीं माझा पाणउतारा करीत असते. मुंबईला रेडिओवर माझं गाणं असलं, कीं साहाजिकच आजुबाजूचीं माणसं आमच्या खोलीवर येऊन म्हणतात, " आज राजनचं गाणं आहे ना ? रेडिओ तरी लावा ! " तर ही त्यावेळीं बाहेर तरी जायला निघते किंवा रेडिओ बिघडलाय असं सांगून त्यांना वाटेला तरी लावते !

**लक्ष्मी** : काय ग, खरं हें ?

**विमल** : खरं आहे. अग पण यांचं गाणं ऐकायला आजुबाजुचीं माणसं येतात तीं कुणी म्हातारी-खोतारी माणसं नसतात !

**लक्ष्मी** : तर कोण असतात ?

**विमल** : आमच्या मजल्यावरच्या चार चावट पोरी येतात यांचं रेडिओ-वरचं गाणं ऐकायला !

**राजन** : त्या पोरी चावट-वात्रट असतील, मी तर तसा नाहीं ना ? आणि हिनं जरी माझ्या गाण्याच्या वेळी रेडिओ लावला नाहीं तरी त्या संगीतप्रेमी मुली दुसऱ्या कुणाच्या तरी खोलींत जाऊन माझं गाणं ऐकतात. आणि मी खोलीवर यायला लागलों कीं, मी रेडिओवर म्हटलेलं गाणं मला ऐकू जाईल अशा आवाजांत मुद्दाम म्हणत राहातात. आणि तें हिनं ऐकलं, कीं ही अशी जळफळते-त्या दिवशीं दोन-तीन कपबशा तरी मोरींत आपटून फोडून टाकते ! अहो वहिनी, हिला चाळीशी उलटून गेलेला थोडासा म्हातारा नवरा मिळाला पाहिजे होता, म्हणजे मग माझ्यासारख्या तरुण, सुंदर, कलावंत नवऱ्याची काय किंमत असते तें हिला चांगलं समजलं असतं. बारा वर्षं घोर तपश्चर्या करून माझ्यासारखा सर्वांगसुंदर नवरा कुणाला मिळाला नसता, तो मी हिला अगदीं फुकटांत पडलोंय ना-म्हणून हिला माझी किंमत वाटत नाहीं.

**लक्ष्मी** : मग हिच्याशीं लग्न कां केलंत तुम्हीं ?

**राजन** : काय सांगू तुम्हांला ! हजारों रुपये हुंडा घेऊन सुंदर सुंदर मुलींचे बाप आमच्या दारांत एकमेकांना दणादण आदळत होते, पण आमचे काका-शाळामास्तर, त्यानीं माझ्यासाठीं ही काकू पसंत केली.

**लक्ष्मी** : ही काय तशी दिसायला वाईट आहे ?

**राजन** : नाहीं ! माझे काकाहि मला असंच म्हणाले. राजन, सौंदर्यावर जाऊं नकोस. आपला संसार सुखाचा करील अशा बावळट मुलीशीं लग्न कर !

**विमल** : काय म्हणालांत ?

**राजन :** नाहीं–नाहीं बावळट नाहीं, बालबोध वळणाच्या मुलीशीं लग्न कर. काकांचा मी लाडका. सर्व शिक्षण वगैरे त्यानींच केलेलं. त्यांना वाईट वाटूं नये म्हणून मी नाईलाजानं हो म्हणालों आणि एका शुभ गोरज मुहूर्तावर माझं कपाळ या खडकावर फुटलं !

**लक्ष्मी :** असं हो काय म्हणतां ? आमच्या विमलसारखी संसारदक्ष मुलगी तुम्हांला शोधूनहि सांपडली नसती.

**राजन :** मी कुठं शोधायला गेलों होतों ? आमच्या काकानींच हें रत्न शोधून काढून माझ्या गळ्यांत बांधलं !

**लक्ष्मी :** खरोखरच आमची विमल एक रत्नच आहे.

**राजन :** हो ना ! पहिल्या–पहिल्यानं हें रत्न खूप लाजायचं. लाईटच देईना. नजरेला नजर पडली कीं, मिळेल त्यांत डोकं खुपसायची. जरा हसलों कीं, इश्यबाई म्हणून उड्या मारायची. पण वर्ष–सहा महिन्यांत सगळच उलटं झालं. मलाच हिनं दम द्यायला सुरुवात केली. माझ्या सगळ्या हालचालींवर हिनं कंट्रोल बसवला. आपला नवरा कसली तरी भयंकर कारस्थानं करण्यांत नेहमीं गुंतलाय असं समजून, ही माझ्याकडे सी. आय. डी. च्या नजरेनं पाहूं लागली. कधीं स्नो पावडर लावून चांगले कपडे करून बाहेर पडलों तर हल्लीं हिच्या पोटांत दुखूं लागतं, कसल्या तरी कारणानं जवळ येऊन माझ्या कपड्यांची ही इस्त्री मोडते तेव्हां हिला कुठं बरं वाटतं !

**लक्ष्मी :** कां ग अशी वागतेस ?

**राजन :** कारणं नाजूक आहेत त्याचीं !

**लक्ष्मी :** म्हणजे ?

**राजन :** आपला नवरा कुणाला चांगला दिसूं नये–विशेषतः स्त्रियांना ! पण मूळचं सौंदर्य का असल्या दडपशाहीनं दडपलं जाणार आहे ? आतां ही पावडर वगैरे चोपडून आलीय म्हणून जरा बरी दिसतेय. पण सकाळीं उठल्या बरोबर हिचं थोबाड पहाल ना, तर तुमच्या घशाखालीं चहा सुद्धां उतरायचा नाहीं. ( विमल – लक्ष्मी हंसतात. )

**विमल :** पाहिलंस लक्ष्मी, मी तुला सांगितलं नव्हतें माझे राजन असे खट्याळ अन् गोड गोड बोलतात म्हणून ?

**लक्ष्मी :** काय हो हें तुम्हीं हिला अगदीं मनापासून बोलतां का ?

**राजन :** मनापासून ? अहो तुम्हीं मला किंवा हिला एखादा वाकडा शब्द बोलून पहा ! पहा कसे आम्हीं दोघंहि तुमच्यावर तुटून पडतों कीं नाहीं तें ! अहो, तुम्हीं हिला चिमटा काढलात तर मला कळ लागेल इतका आम्हां दोघांचा एकजीव झालाय. कधीं साध्या सर्दीनं माझं अंग गरम झालं, तर डोक्याला बाम काय चोळील, डोक्याला कांदे काय बांधील, बाळकडु पाजील. एका औषधानं गुण आला नाहीं तर दुसऱ्या तासाला दुसरं औषध देईल. दिवसांतून सतरा औषधं पाजील. पंधरा-पंधरा मिनिटांनीं काखेंत थर्मामिटर खुपसून, डॉक्टर सारखा गंभीर चेहरा करून ही खोलींत येरझारा घालीत राहील. त्यावेळच्या हिच्या एकंदर हालचालीकडे कुणी बाहेरचा माणूस पाहील, तर तो मनांत म्हणेल, ' बिचाऱ्याचा आतां क्षणाचाहि भरंवसा नाहीं.' ( मोठ्यानं हंसतो. )

**विमल :** हो – हो – हो ! हंसता काय ? चला ! बायकोचे गोडवे गाईलेत तेवढे पुरे झाले. ( उठून ) जातों हं आम्हीं !

**लक्ष्मी :** आतां येतांना अनिलला घेऊन या !

**राजन :** मी अनिलला घेऊन येत होतों ना ! पण तो आजीला सोडायला तयार नाहीं आणि आजी त्याला सोडायला तयार नाहीं. बाकी म्हातारीं माणसं घरांत असल्याचा हा मोठा फायदा असतो. मुलं त्यांच्या स्वाधीन केलीं, कीं आमच्यासारख्या तरुण माणसांना वाटेल तिथं हुदडायला मिळतं. बरं जातों हं आम्ही ! सखारामभाऊंना सांगा आम्हीं आलों होतों म्हणून ! आहेंच मी पंधरा एक दिवस इथं, एक दिवस जाऊंया सर्वजण फिरायला.

**विमल :** जातें हं ! चला ! ( विमल-राजन जातात. लक्ष्मी त्यांना दूर जाईपर्यंत पहाते. )

मुक्या मनाच्या मूक वेदना
समजतील त्या कशा कुणा ?
सोनेरी स्वप्नांचे रचिले
मनीं मी माझ्या उंच मनोरे
मृगजलसम विरले सारे
अर्थ नुरला उदास जीवना !

[ लक्ष्मी घरांत जात असतां विश्राम येतो. वय २६–२७ वर्षें, आधुनिक वेषभूषा. ]

**विश्राम :** ( भारावलेल्या आवाजांत आतुरतेनं हांक मारतो. ) लक्ष्मी !

**लक्ष्मी :** ( भेदरून त्याच्याकडे पहात ) विश्राम ! तूं – तूं–

**विश्राम :** हो ! मी आलोंय लक्ष्मी !

**लक्ष्मी :** मी आलोंय लक्ष्मी ! ( तिरस्कारानं ) चालता हो इथून !

**विश्राम :** लक्ष्मी ! मी काय म्हणतों तें ऐकून तर घे आधीं !

**लक्ष्मी :** कांहीं ऐकायचं नाहीं मला ! चालता हो म्हणतें ना इथून !

**विश्राम :** ( थोड्या वेळापूर्वीची मार्दवता विसरून बेळूटपणें ) इतकी भेदरून – डोळे फाडून काय पहातेस माझ्याकडे ! इतका का मी भयंकर दिसतों ? मला वाटतं मी पूर्वीपेक्षां छान दिसतोंय. पहा ना चांगलं निरखून !

**लक्ष्मी :** विश्राम, इथं कां आलास तूं ?

**विश्राम :** कां आलों ? आपली ओळख होती म्हणून ! तुला पहायला, भेटायला—

**लक्ष्मी :** विसरून जा ती ओळख !

**विश्राम :** विसरून जायला आपली नुसती तोंड ओळख होती का ती ? मला वाटतं आपण एकमेकांवर, आपलं काय म्हणतात तें – तें आपलं – प्रेम सुद्धां केलं होतं, नाहीं का ?

**लक्ष्मी :** प्रेम ! विसरून जा तें !

**विश्राम :** कसं विसरूं तें ? आपण एकमेकांना प्रेमपत्रं सुद्धां पाठवलीं होतीं नाहीं ? तूं मला पाहिल्यानं पत्र पाठवलं होतंस कीं मी तुला पाहिल्यानं पत्र पाठवलं होतं ? मला वाटतं पाहिल्यानं तूं – नाहीं, मीच तुला पत्र पाठवलं होतं. किती सुंदर अक्षरांत पत्र लिहिलं होतं मी. 'प्रिय लक्ष्मी, तूं मला किती आवडतेस म्हणून सांगूं ! तूं मला एक दिवस दिसली नाहींस तर मी वेडापिसा होऊन जातों,' वगैरे–वगैरे ! त्यावर तूं उत्तर पाठवलं होतंस, ' प्रिय विश्राम, माझं तुझ्यावर इतकं प्रेम आहे, तुझ्याशिवाय मी एक क्षणभरहि जिवंत राहूं शकणार नाहीं.' इतकं माझ्यावर प्रेम करणारी तूं– आतां त्याच विश्रामवर तुझं काडीइतकंहि प्रेम शिल्लक राहिलं नाहीं ? मला वाटलं होतं तुझ्या या चोरट्या प्रेमवीराचं चोरून तूं प्रचंड स्वागत करशील !

**लक्ष्मी :** माझं लग्न झालंय आतां !

**विश्राम :** कळलंय तें मला ! पण लक्ष्मी, सगळीं नातीं तुटलीं ना, तरी एक नातं कधींच तुटत नाहीं. फारच चिवट असतं नातं तें !

**लक्ष्मी :** तुझं नि माझं आतां कसलंहि नातं राहिलं नाहीं.

**विश्राम :** नाहीं कसं ? हंसरं तोंड करून मला हाक मार ना ! भाऽऽऽ ईऽऽऽ! मग मी तितक्याच बेशरमपणें हंसत म्हणेन ताऽऽऽईऽऽऽ!

**लक्ष्मी :** तुरुंगांत जाऊन पुरता बदमाश होऊन आलास !

**विश्राम :** ( हंसत ) मी चोरी केली. तुरुंगांत जाऊन सुटून सुद्धां आलों. पण तूं भेल्याशिवाय कांहीं तुझी या तुरुंगांतून सुटका होणार नाहीं. छान तुरुंग आहे हं ! या तुरुंगाचे जेलर कुठंयत !

**लक्ष्मी :** कोण जेलर ?

**विश्राम :** तुझा नवरा ग ! शांत, मनमिळाऊ, कुणाच्या उठण्या–बसण्यांत नाहीं. परोपकारी, अगदीं संत सखाराम म्हणून त्यांना हांक मारायला हरकत नाहीं, असं ऐकलंय मी ! ( भिंतीकडे पहात ) फोटो–बिटो काढलाय कीं नाहीं तुम्ही दोघांनीं ? कुठं दिसत नाहीं ?

**लक्ष्मी :** विश्राम, तूं पहिल्यानं निघून जा ! जा–चालता हो !

**विश्राम :** ( वेडावून ) अश्य का ! ज्याऊं ? नवऱ्यावर फारच प्रेम दिसतंय तुझं ! पण काय ग, हल्लीं थोडीशी वाळलेली दिसतेस तूं ! लग्न कांहीं तुला तितकसं मानवलेलं दिसत नाहीं.

**लक्ष्मी :** या घरांत मी तडफडून मेलें तरी रडायला येऊं नकोस तूं ! जा !

**विश्राम :** छे छे छे ! तूं मरूं नकोस. सुखानं संसार कर. तुझा सुखी संसार पाहून मला आनंदच वाटेल. तुझं आणि माझं एकेकाळीं प्रेम होतं– पण परिस्थितीच अशी आली कीं, आपली ताटातूट झाली. अग जगांत सगळ्याच प्रेमवीरांचीं लग्न थोडींच होतात ? म्हणून रडत का बसायचं ? वेडी कुठली ! जाऊं दे मरूं देत त्या मागच्या गोष्टी ! झालं गेलं होऊन गेलं ! काय ? ( खुर्चीवर बसतो. ) बऱ्याच दिवसांनीं आलोंय, चहा कर ना !

**लक्ष्मी :** पाणीसुद्धां मिळणार नाहीं तुला या घरांत.

**विश्राम :** चहा नाहीं तो नाहीं पण पाणी सुद्धां देणार नाहींस ? किती दुर्दैवी माणूस आहे मी ! ( खुर्चीवरून उठून ) काय ग लक्ष्मी, तें आपलं तें प्रेमाचं राहूं दे ! तें आतां जुनं झालं. पण माझ्याबद्दल तुला साधी सहानुभूति सुद्धां वाटत नाहीं ?

**लक्ष्मी :** सहानुभूति ? या जन्मांत तुझं कधीं तोंड पाहूं नये असं वाटतं.

**विश्राम :** ( वेडावून ) अश्य का ! तोंड सुद्धां पाहूं नये असं वाटतं ? मग इथं राहाण्यांत आतां काय अर्थ आहे ? जातों मी पण हें बघ दाराला आंतून कडी लावून घे ! नाहीं तर माझ्या सारखा दुसरा कुणी तरी घुसायचा घरांत. ( हंसत जाऊं लागतो पण लक्ष्मी बोलते तसा तो दारावर पाठमोरा राहून ऐकत राहातो. )

**लक्ष्मी :** कुणाच्या तरी घरांत घुसायला गांवांतले लोक तुझ्यासारखे चोर नाहींत. मला भेटायला–पहायला आलास. लाज कशी वाटली नाहीं तुला इथं यायला ? मी भोळ्या मनानं तुझ्यावर प्रेम केलं. पैसा, घरदार, धनदौलत कांहीं कांहीं नको होतं मला ! मला फक्त तूं हवा होतास ! मला माहीत होतं, माझा विश्राम गरीब आहे–फार गरीब आहे. पण त्याचे लाख मोलाचे गुण आहेत.

आज ना उद्यां तूं जगांत नांवलौकिकाला येशील, तुझ्या गुणावर भाळलें होतें मी. तुझ्या चिंतनाच्या धुंदींत होतें. पण निर्दया—एके दिवशीं तूं माझ्या आशाआकांक्षेच्या चुराडा करून टाकलास. स्वतःच्या स्वार्थासाठीं—चैनीसाठीं तूं चोरी केलीस. (विश्राम मागं फिरून हळूहळू पुढं येतो. ) त्यापेक्षां हमाली केली असतीस तरी ही लक्ष्मी तुझ्या पायाला मिठी मारून रडली असती. पण तूं चोरी केलीस. पहिल्यानं मला खरं सुद्धां वाटलं नाहीं. विश्राम आणि चोरी करील ? मी जीव तोडून सगळ्यांना सांगत होतें, विश्राम कधींहि चोरी करणार नाहीं—कधींही चोरी करणार नाहीं. पण सर्वांनीं मला वेडी ठरवली. कारण तूं खरोखरीच चोरी केली होतीस. चोर दरोडेखोर म्हणून लोक तुला हिणवूं लागले. मला तें ऐकवेना. कुठं तरी जाऊन मी ओक्साबोक्सी रडत राहायची, तुझी आठवण काढून. पण नंतर मला तुझा वीट आला. मनानं मोठा समजलेला तूं—खरोखरच मोठा नसून क्षुद्र नालायक वाटलास तूं मला ! तुझ्यावरचं प्रेम, सहानुभूति सर्व कांहीं त्या वेळीं जळून गेली. जगांत आतांपर्यंत कुणाचा केला नव्हता इतका तुझा मी तिरस्कार करूं लागलें. त्याचवेळीं बाबांनीं माझ्या लग्नाची गोष्ट काढली. एरवीं तशी गोष्ट निघाली असती तर कुणाचीहि पर्वा न करतां 'मी विश्रामशींच लग्न करणार' असं निर्धारानं सांगितलं असतं. पण त्यावेळीं तुझं साधं नांव घ्यायलाहि मला शरम वाटली. गांवांत तुझ्या-माझ्या नांवाची कुजबूज होती. कुणींहि माझ्याशीं लग्न करायला कबूल होईना आणि शेवटीं नाईलाजानं मनाविरुद्ध ज्याला कधीं पाहिलं नव्हतं, अशा चाळिशी उलटून गेलेल्या दुसरेपणाच्या नवऱ्याची बायको म्हणून मला या घरांत यावं लागलं. कृतघ्ना, तुझ्यामुळं मी या घरांत आलें. तूं मला या घरांत आणलंस. आणि आज मोठ्या दिमाखानं मला पहायला—भेटायला आलास ? मी कशी धडपडतेंय—मरतेंय—माझा कसा तडफडाट चाललाय तो निर्लज्जपणें पहायला आलास राक्षसा ? जा—चालता हो ! तुझं हें हलकट थोबाड दाखवायला पुन्हां इथं येऊं नकोस !

**विश्राम :** ( त्वेषानें ) लक्ष्मी !

**लक्ष्मी :** माझं नांव घेण्याची सुद्धां तुझी योग्यता नाहीं. जा—पुन्हां जाऊन कुणाची तरी चोरी करून तुरुंगांत जा मरायला. विश्वासघातकी !

**विश्राम :** मी विश्वासघातकी नाहीं, तूं विश्वासघातकी आहेस.

**लक्ष्मी :** मी ?

**विश्राम :** हो हो तूं ! याच तोंडानं तूं मला सांगत होतीस ना ? 'विश्राम, तूं कसाहि असलास–कुठंहि गेलास–काहींहि केलंस तरी ही लक्ष्मी तुझीच आहे. तुझी आणि माझी ताटातूट जगांतील कोणत्याहि शक्तीला करतां येणार नाहीं !'

**लक्ष्मी :** गरिबींत सज्जनपणानं वागला असतास तर मी तुझ्यासाठीं वाटेल तें दिव्य केलं असतं. तुझ्यासाठीं जीवमुद्धां दिला असता. पण तूं य:कश्चित चोरी केलीस.

**विश्राम :** हो हो मी चोरी केली. पण ती मी कां चोरी केली, कशा-साठीं. कुणासाठीं चोरी केली याचा तूं कधीं विचार केलास का ? कुणाला कधीं विचारलंस का ?

**लक्ष्मी :** एका चोराच्या चारित्र्याची चव्हाट्यावर जाऊन चौकशी करायला मी निर्लज्ज नव्हतें. जगाच्या, कायद्याच्या दृष्टीनं तूं चोर ठरलास.

**विश्राम :** सगळ्यांच्या दृष्टीनं मी चोर ठरलों, कबूल आहे मला. जिथं मी खरोखरच चोरी केली होती तिथं मला सज्जन म्हणून लोक माझ्यावर फुलं थोडींच उधळणार होते ? पण तूं ? तुझा तरी माझ्यावर विश्वास होता ना ? इथं आल्यावर एका सहानुभूतीच्या शब्दानं तरी माझ्याशीं बोललीस का ? उलट निर्ढावलेल्या चोर--दरोडेखोरासारखी तूं माझी संभावना केलीस. म्हणून मी सुद्धां तुझ्याशीं तितक्याच बेछुटपणानं बोललों. मला तुझी नुसती एका शब्दानं सहानभूति मिळाली असती तर मी इथं एक क्षणभर मुद्धां थांबलों नसतो. पण तूं सहानभूतीच्या ऐवजीं काळजाला भिडणाऱ्या विषारी शब्दांचं गरळ ओकलीस. जखमेवर फुंकर घालायची त्याच जखमेवर निर्दयतेनं तूं आणखी वार केलेस ! चोरीच्या एका क्षुल्लक चुकीसाठीं माझ्या भावनांचा, माझ्या सद्गुणांचा, माझा तिरस्कार करणाऱ्या तुझ्यासारख्या हलकट माणसाचं थोबाड असं फोडून टाकावसं वाटतं मलां ! ( लक्ष्मीच्या तोंडांत मारतो. )

**लक्ष्मी :** ( त्वेषानं ओरडून ) विश्राम ! चालता हो ! चालता हो इथून ! नाहीं तर ओरडून सारा गांव जमा करीन मी इथं !

**विश्राम :** आतां ओरडणार तूं ? ज्या वेळीं ओरडून सारा गांव जमा करून त्यांना सत्य सांगायचं त्या वेळीं तोंड मिटून गप्प बसलीस. लग्नाच्या नांवाखालीं शेळ्या–मेंढराप्रमाणं तुला इथं डांबून टाकलं त्या वेळीं ओरडली नाहींस, आणि आतां ओरडणार ? ओरड– जमूं दे सारा गांव ! लोकांच्या दृष्टीनं मी इतका भयंकर माणूस आहे, कीं तूं कांहीं सांगायच्या अगोदरच लोक माझा मुडदा पाडतील. ओरड–टाहो फोडून ओरड ! ( थोडा वेळ कुणीच कांहीं बोलत नाहीं. ) मी ज्या लक्ष्मीवर प्रेम केलं होतं ती किती थोर विचाराची–कोणत्याही परिस्थितींत संकटांना न घाबरतां दुसऱ्याच्या दुःखाचा माणुसकीनं विचार करणारी दयेची देवता वाटत होती मला ! पण तें मृगजल होतं–स्वप्न होतं–आभास होता. चोरीच्या आरोपावरून मला पकडण्यांत आलं. चोरी केल्याचं कोर्टांत मी कबूल केलं. मला शिक्षा झाली. तुरुंगांत नेत असतांना मी चारी बाजूंना पहात होतों. सारे लोक मला पाहून आपसांत हंसत होते. जन्मभर गरीब लोकांची कायदेशीर चोरी करणारे प्रतिष्ठितहि मला पाहून फिदी–फिदी हंसत होते. मला त्यांची पर्वा नव्हती. तुला पहाण्यासाठीं माझ्या जिवाचा तडफडाट चालला होता. मला आशा होती. वाटेल त्या परिस्थितींत तूं येऊन, डोळ्यांत प्राण आणून म्हणशील, ' विश्राम, काय केलंस हें ? ' त्यावर मी सांगितलं असतं, ' लक्ष्मी मी निर्दोष आहें. माझ्यावर विश्वास ठेव ! सुटून आल्यानंतर तुला सांगेन, माझ्यावर विश्वास ठेव ! ' पण तूं आली नाहींस. मी तुरुंगांत गेलों पण माझं मन तुझ्याभोंवतीं सारखं भिरभिरत होतं. तुला सत्य सांगण्यासाठीं माझ्या जिवाचा तडफडाट चालला होता. लक्ष्मी, मी माझ्यासाठीं–माझ्या स्वार्थासाठीं–माझ्या चैनीसाठीं चोरी केली नाहीं. माझ्या मित्राची अब्रू वांचविण्यासाठीं मी माझी अब्रू पणाला लावली त्याला सज्जनपणानं वांचावण्याचा दुसरा कुठलाच मार्ग त्यावेळीं नव्हता. म्हणून चोरी करून त्याला वांचवण्याचा प्रयत्न केला, पण तोहि निष्फळ ठरला. मी चोर ठरलों. मला वाटलं होतं, साऱ्या जगानं जरी चोर–दरोडेखोर म्हणून माझ्याभोंवतीं आक्रोश केला, तरी माझी लक्ष्मी मला

कधींहि चोर म्हणणार नाहीं ! मी सुटून येईपर्यंत ती माझी वाट पाहील ! मला विचारील. तिला मी समजाऊन सांगेन. पुढील आयुष्यांत कर्तबगारीनें मी तो चोरीचा कलंक धुऊन टाकीन. केवढी आशा वाटत होती मला ! पण ती आशा फोल ठरली. लक्ष्मी, मला तूं ओळखलं नाहींस. माझं प्रेम ओळखलं नाहींस. खरं म्हणजे आज मी माझ्या लक्ष्मीची क्षमा मागायला आलों होतों. जगाच्या दृष्टीनं मी गुन्हेगार होतों ना ! म्हणून तुझ्या पायावर डोकं ठेवून क्षमा मागणार होतों मी लक्ष्मी !

**लक्ष्मी :** ( भाराऊन ) विश्राम, खरं हें विश्राम ?

**विश्राम :** होय लक्ष्मी ! खरंच मी तुझी क्षमा मागणार होतों !

**लक्ष्मी :** विश्राम !

**विश्राम :** ( लक्ष्मीच्या जवळ जात ) लक्ष्मी ! अशीच हांक मारायचीस तूं मला ! माझी लक्ष्मी अशीच हांक मारायची मला ! लक्ष्मी, मी पूर्वी-इतकाच सद्गुणी आहें. माझ्या लक्ष्मीजवळ मी खोटं बोलणार नाहीं—कधींच खोटं बोलणार नाहीं.

**लक्ष्मी :** ( भारावलेल्या मनःस्थितींतून भानावर येत ) नाहीं—नाहीं, मी तुझी लक्ष्मी नाहीं. तूं माझा नाहींस. तूं मला फसवायला पहातोस ! गोड शब्दांनीं स्वतःचा गुन्हा लपवूं पहातोयस ! जा—जा तूं इथून !

**विश्राम :** ( लक्ष्मीकडे रोखून पहात तिरस्कारानं ) बदमाश ! जातों मी ! माझ्या सद्भावना पायाखालीं तुडवणाऱ्याला मी सुखानं जगूं देणार नाहीं. पावला—पावलागणिक रडवीन तुला ! ( झटकन् जात असतां बाबा येतो. )

**बाबा :** ( तिरस्कारानं ) विश्राम ? तूं—तूं इथं कां आलास ?

**विश्राम :** ( शांतपणें ) इथं म्हणजे कुठं ?

**बाबा :** या घरीं !

**विश्राम :** कुणाचं हें घर ?

**बाबा :** लक्ष्मीचं !

**विश्राम :** लक्ष्मीच्या घरीं आलोंय, तुमच्या घरीं आलों नाहीं ना ?

**बाबा :** चोराला मी माझ्या खेटराजवळसुद्धां उभा करणार नाहीं.

**विश्राम :** चोर ? (हंसतो) म्हणे मी चोर ! आणि तुम्हीं काय सज्जन अहांत ?

**बाबा :** मी तुझ्यासारखी कुणाची चोरी केली नाहीं.

**विश्राम :** बाबासाहेब, मी चोरीच केली पण तुम्ही दरोडा घातलात. जन्मांतून उठवलंत एका स्त्रीला !

**बाबा :** कुठल्या स्त्रीला ?

**विश्राम :** या तुमच्याच मुलीला !

**बाबा :** हिचं मी लग्न केलंय. सुखानं संसार करतेय ती !

**विश्राम :** लग्न केलंत तुम्हीं हिचं ? माणसाशीं कीं मुडद्याशीं ? अहो माझ्यासारख्या चोराला आपली मुलगी द्यायला तुम्हांला शरमच वाटत होती, तर मी सुटून आल्यावर मला तसं सांगितलं असतं, तर मी हिच्याशींच लग्न करणार म्हणून तुमच्या उंबरठ्यावर डोकें आपटीत राहिलों नसतों. खुशाल हिचं दुसऱ्याशीं लग्न करा असं सांगितलं असतं. बरं लग्न केलंत तें तरी तरुणाशीं ? तेंहि नाहीं. चाळिशी उलटून गेलेल्या दुसरेपणाच्या एका बावळट माणसाशीं जबरदस्तीनं तुम्हीं हिचं लग्न केलंत. आणि म्हणे सुखानं संसार करतेय ही ! (हंसतो)

**बाबा :** दुष्ट माणसाचे विचार नेहमीं दुष्टच असायचे !

**विश्राम :** बाबासाहेब, आतां मी नुसता दुष्ट राहिलों नाहीं. दरोडेखोर दगाबाज—सैतान—राक्षसांचा क्रूरपणा माझ्या डोक्यांत थैमान घालतोय. त्या निष्ठुर क्रूरतेनं तुम्हीं उभारून दिलेला हिचा उरला—सुरला सुखाचा संसार उध्वस्त करून टाकणार आहें मी ! माझ्या एका चुकीसाठीं माणसांतून उठविणाऱ्यांचा सूड घेणार आहें मी ! लक्ष्मी जातों मी ! पुन्हां येईन तुला भेटायला ! (जातो).

**बाबा :** लक्ष्मी, विश्राम इथं कां आला होता? जातांना असं कां म्हणाला तो?

**लक्ष्मी :** मला कांहीं विचारूं नका—कांहीं विचारूं नका मला. जा तुम्ही इथून!

**बाबा :** तुला कांहीं बोलला का तो? का तुला मारलं त्यानं?

**लक्ष्मी :** तुम्हीं या घरीं देऊन मला एकदां मारलंत, आतां आणखी मला कोण मारणार आहे?

**बाबा :** म्हणजे, तूं इथं सुखी नाहींस? सखाराम तुझ्याशीं चांगलेपणानं वागत नाहींत?

**लक्ष्मी :** हो तर! मी फार सुखी आहें. तेहि माझ्याशीं चांगलेपणानं वागतात.

**बाबा :** वाटलंच मला! सखाराम फार सद्गुणी आहेत. तुला ते सुखी करतील.

**लक्ष्मी :** किती सुखाचा संसार थाटून दिलात तुम्ही तुमच्या मुलीला बाबा!

**बाबा :** तूं सुखांत आहेस ना? असाच सुखानं संसार कर!

**लक्ष्मी :** सुखानं संसार! लहानपणीं किती—किती लाड केलेत तुम्हीं माझे. पण मोठेपणीं या स्मशानांत आणून जिवंत जाळलीत मला!

**बाबा :** असं म्हणूं नकोस लक्ष्मी! तुला दुःख देण्याइतके सखाराम दुष्ट नाहींत.

**लक्ष्मी :** त्यांच्या दुष्टपणापेक्षां खरा दुष्टपणा केलात तुम्हीं! विश्रामवरून गांवांत माझ्याशीं कुणी लग्न करण्यास तयार होईना, म्हणून तुम्हीं—तुमच्या नांवलौकिकाचे, घराण्याच्या अब्रुचे, मोठमोठे दगड माझ्या डोक्यांत घालून या घरांत ठेचून मारलीत मला! आणि आतां सुखानं संसार करायला सांगतां?

**बाबा :** आयुष्यांत सगळ्याच गोष्टी मनासारख्या होत नाहींत लक्ष्मी!

**लक्ष्मी :** हें का मला समजत नाहीं ? मी का तुम्हांला एखाद्या श्रीमंत माणसाशीं माझं लग्न करा असं सांगत होतें ? एक वेळ अन्नाला महाग असलेल्या कर्तबगार तरुणाशीं माझं लग्न केलं असतं, तरी मी तिथं सुखानं राहिलें असतें. पण तुम्ही अशा माणसाशीं माझं लग्न केलंत...

**बाबा :** परिस्थितीच तशी होती त्या वेळीं ! त्याला माझा नाईलाज होता.

**लक्ष्मी :** त्या परिस्थितींतून तुम्ही स्वतःची सुटका करून घेतलीत. आपली अब्रू बचावल्याचा आनंद झाला तुम्हांला. पण आपली एकुलती एक पोर जन्मभर इथं रडत राहाणार याची तुम्हांला थोडीशीहि कशी खंत वाटली नाहीं ! लहानपणीं एखाद्या वस्तुसाठीं हट्ट धरून मी रडूं लागलें, कीं कुठूनहि ती वस्तु तुम्ही आणून द्यायचेत. मी हंसलें कीं, तुम्हीहि हंसायचे. इतक्या तुमच्या मायाळू मनांत त्याच वेळीं इतका कठोरपणा कसा हो आला ? ( रडते. )

**बाबा :** लक्ष्मी रडूं नकोस. बेअब्रूच्या भीतीनं मी ती चूक केली. पण झाल्या गेल्या गोष्टी विसरून जा आतां.

**लक्ष्मी :** विसरूं ? काय विसरूं ? तुम्ही माझं चाळीशी उलटून गेलेल्या माणसाशीं लग्न केलंत हें विसरूं, कीं माझं लग्न लावणाऱ्या जन्मदात्या बापाला विसरूं ? सांगा कुणाला विसरूं आणि कसं विसरूं तें सांगा ? ( बाबा काय बोलावं यानं भांबावून जातो. लक्ष्मी थोडी थांबून ) बाबा, या विसरण्यासारख्या का गोष्टी आहेत ?

**बाबा :** एक वय सोडलं, तर कोणताहि दुर्गुण सखारामांत शोधून सांपडायचा नाहीं. मनाचे प्रेमळ – सद्‌गुणी आहेत. तुझ्या सुखासाठीं आयुष्यभर झटत राहतील सखाराम ! आईच्या इच्छेसाठीं त्यांनीं लग्न केलं तेव्हां—

**लक्ष्मी :** गोड शब्दांनीं दुष्ट स्वार्थ लपत नसतो. म्हणे आईच्या इच्छेसाठीं लग्न केलं. आईच्या इच्छेसाठीं लग्न करणाऱ्या तुमच्या सद्‌गुणी जांवयाला

... ३ ...

दुसऱ्या एका स्त्रीच्या इच्छा–आकांक्षा धुळीला मिळणार आहेत याची लाज वाटायला पाहिजे होती.

**बाबा** : लक्ष्मी, तुला काय बोलायचं असेल तें मला बोल ! शिव्या दिल्यास तरी मी ऐकून घेईन ! पण त्या भाबड्या जिवाला–सखारामना कांहीं बोलूं नकोस. त्यांची बेअब्रू होईल असं कांहीं करूं नकोस.

**लक्ष्मी** : माझ्यामुळं त्यांची कशी बेअब्रू होणार आहे ?

**बाबा** : मी सांगतों म्हणून रागावूं नकोस. विश्रामला इथं येऊं देऊं नकोस. त्याला विसरून जा !

**लक्ष्मी** : म्हणजे ? तुम्हांला म्हणायचंय तरी काय ?

**बाबा** : विश्रामच्या आणि तुझ्या गोष्टी सखारामना समजल्या तर त्यांना मरणप्राय दुःख होईल. आमची अब्रू जाईल असं कांहीं करूं नकोस लक्ष्मी !

**लक्ष्मी** : अब्रू ! माझ्याशीं कुणी लग्न करण्यास तयार नव्हता त्यावेळीं तुमची अब्रू जात होती ! विश्राम नुसता इथं आला त्यानं तुमची अब्रू वर खालीं होतेय ! खरं म्हणजे तुम्ही दोघांनीं माझी बेअब्रू केलीत. माझं मनाविरुद्ध लग्न करणारे आणि आपलं वय न पाहतां जिच्याशीं आपण लग्न करणार त्या मुलीच्या भावना निष्ठुरतेनं पायाखालीं तुडवणारे तुम्हीं दोघे खरे गुन्हेगार आहांत. आणि आतां तुम्हींच मला अब्रूच्या गोष्टी सांगतां ? केव्हां केव्हां तुमचा असा राग येतो मला–या जन्मांत तुमचं कधीं...

**बाबा** : लक्ष्मी !

**लक्ष्मी** : जा–जा तुम्ही आतां ! अब्रू–अब्रू म्हणून तुम्हांला रडायचं असेल, तर तुमच्या घरीं जाऊन रडत बसा. मी माझ्या दुःखानं मरतेंय ती मला सुखानं तरी मरूं द्या ! जा ! ( झटकन् घरांत जाते. )

**बाबा** : लक्ष्मी ! ( लक्ष्मी गेली तिकडे अस्वस्थपणें पहात राहातो. थोडया वेळानं हळुहळूं बाहेर जाऊं लागतो. थांबून मागं पहातो. परत मागं

येऊन हांक मारतो. ) लक्ष्मी ! जातों हं मी ! ( हळुहळू जाऊं लागतो, लक्ष्मी येते. )

**लक्ष्मी** : ( दु:ख आवरीत ) बाबा ! ( बाबा प्रेमभरानं मागं फिरून पहातो. ) चहाला पाणी ठेवतें. थांबा जरा !

**बाबा** : ( भारावलेल्या आवाजांत ) नको चहा मला ! जातों मी !

( जाऊं लागतो. लक्ष्मी पुढं होऊन )

**लक्ष्मी** : बोललें म्हणून वाईट वाटलं तुम्हांला ? रागावलांत माझ्यावर ?

**बाबा** : रागावलों नाहीं आणि वाईटहि नाहीं वाटलं. आम्ही वडील माणसं केव्हां केव्हां खोट्या अब्रूला भिऊन, आपल्या मुला-बाळांच्या भावना पायाखालीं तुडवून त्यांना जन्माचे दु:खी करतों. तीच चूक—कधींहि न सुधारणारी चूक मी केलीय. पण ती सूड बुद्धीनं नाहीं. इतका मी दुष्ट नाहीं. आम्ही चुकलों पण तूं चूक करूं नकोस. आमची अब्रू आतां तुझ्या हातीं आहे. जातों मी. [ हळू हळू जातो. लक्ष्मी घरांत जाते. थोड्या वेळानं बाहेरून सखाराम आणि विश्वनाथ येतात. किरकोळ देहयष्टी, बरेच केस पिकलेले असल्यामुळं सखाराम वयापेक्षां बराच म्हातारा दिसतो. विश्वनाथचं वय ३३–३४ च्या दरम्यान. दाढी थोडी वाढलेली, डोळे खोल गेलेले. बोलतांना तो मधून मधून खोकतो. बराच जीर्ण झालेला लेंगा व शर्ट असा त्याचा ड्रेस. ]

**सखाराम** : ये, बैस या खुर्चीवर ! ( विश्वनाथ सभोंवार पहात खुर्चीवर बसतो. सखाराम टोपी—कोट काढतां काढतां ) विश्वनाथा, भल्या माणसा, एवढा आजारी असतांना मला साधं पत्र सुद्धां कां पाठवलं नाहींस ?

**विश्वनाथ** : पत्र ! तीन पैसे पडतात पत्राला नाहीं ? पण सखाराम ते तीन पैसेहि नसायचे केव्हां केव्हां माझ्या खिशांत.

**सखाराम** : मग तुझं खाणं—पिणं ? जेवायचास तरी वेळेवर ?

**विश्वनाथ** : नोकरी असेपर्यंत कसं तरी चाललं होतं. पण नोकरी सुटल्यानंतर या वर्ष–सहा महिन्यांत मी कसा जगलों तें माझं मलाच माहीत नाहीं.

**सखाराम** : मुंबईला तुझे कुणीच मित्र नव्हते ?

**विश्वनाथ** : होते ! पुष्कळ मित्र होते माझे.

**सखाराम** : मग त्यांच्याकडे पैसे मागायचे होतेस.

**विश्वनाथ** : माझे मित्र माझ्यासारखेच गरीब होते. त्यांच्याकडे मी कुठल्या तोंडानं हात पसरणार होतों ? लाज वाटायची मला–सखाराम लाज वाटायची मला ! आणि पैसे मागितले असते, तरी त्यांचे पैसे परत कसे देणार होतों ? पैसे मिळवण्याचा एकच मार्ग त्यावेळीं माझ्यासमोर होता. तसा मी एकदां प्रयत्नहि केला.

**सखाराम** : कसला प्रयत्न केलास ?

**विश्वनाथ** : दुपारची वेळ, खिशांत एक पैसा नाहीं. भुकेनं पोटांत आग पेटलेली. ती आग शांत करण्यासाठीं-पोटांत दोन घांस कोंबण्यासाठीं–जगण्यासाठीं–रस्त्यावर उभा राहून मी लाचारीनं ओरडलों, भीक घाला मला, दोन पैशांची भीक घाला ! ( रडतो )

**सखाराम** : ( गहिंवरून ) बोलूं नकोस–विश्वनाथ बोलूं नकोस पुढं ! रस्त्यावर उभा राहून भीक मागितलीस तूं ? मी जिवंत असतांना ? तुझा सखाराम मेला असं वाटलं तुला ? अरे कुणाजवळ साधा निरोप पाठवला असतास, तरी धांवत आलों असतों मी तुझ्यासाठीं ! पण तूं मला कळवलं नाहींस–कधींच कळवलं नाहींस. ( दुःखाचा वेग आवरून ) थांब हं ! जेवून घेऊं या ! ( हांक मारतो ) लक्ष्मी ! ऐकलंस का ? बाहेर ये जरा ! ( लक्ष्मी थोडीशी रागांतच बाहेर येते. )

**लक्ष्मी** : ( सखारामकडे न पहातां ) काय ?

**सखाराम :** आपल्याकडे आज बऱ्याच वर्षांनीं हे पाहुणे आलेत, दोन ताटं वाढ !

**लक्ष्मी :** किती दिवस राहाणार आहेत हे इथं ?

**सखाराम :** बरेच दिवस राहाणार आहेत. प्रकृति बरी नाहीं त्यांची. जा जेवण वाढ जा ! चल विश्वनाथ, हातपाय धुऊन घे !

**लक्ष्मी :** तुम्ही एक छळताहांत मला या घरांत, आणि हा दुसरा मुडदा कशाला आणलांत इथं ?

**सखाराम :** लक्ष्मी असं बोलूं नकोस–असं बोलूं नकोस. विश्वनाथ माझं विश्व आहे–माझा प्राण आहे.

**लक्ष्मी :** तुमचा प्राण इथं राहिला तर माझा प्राण जाईल. राहूं देणार नाहीं इथं मी यांना ! ( विश्वनाथ बाहेर जाऊं लागतो. )

**सखाराम :** थांब–थांब विश्वनाथ ! ( विश्वनाथाच्या हाताला धरतो.) लक्ष्मी, माझ्याशीं कशीहि वागलीस तरी हरकत नाहीं. पण यावेळीं तुझा भाऊ समज याला–याच्याकडे एकदां बहिणीच्या मायेनं पहा !

**लक्ष्मी :** ( तिरस्कारानें ) मला भाऊ नाहीं–आई नाहीं–बाप नाहीं–नवरा नाहीं कुणी नाहीं माझं या जगांत ! सगळ्यांनीं सूड घेतलाय माझ्यावर !

**सखाराम :** लक्ष्मी, इतक्या निष्ठुरतेनं कसं ग बोलवतं तुला ? दुःखी माणसांना मायेचा हात द्यायचा असतो; लाथाडायचं नसतं त्यांना. माझ्या विश्वनाथनं माझ्यावर अलोट प्रेम केलं–आईसारखं ! माझ्या लहानपणीं आमची गरिबी होती. केव्हां–केव्हां उपाशी राहावं लागत असे. तसा असतांना विश्वनाथ यायचा, माझ्याकडे पाहायचा. त्याच्या डोळ्यांत अश्रू यायचे. ते लपवीत मला म्हणायचा, ‘ सखाराम, आज तुला आईनं जेवायला बोलावलंय. ’ मला रडूं कोसळायचं. माझ्यापेक्षां वयानं लहान असूनसुद्धां

एखाद्या मोठ्या माणसासारखा माझी समजूत करीत मला घरीं घेऊन जायचा. केव्हां-केव्हां आईकडून पैसे घेऊन माझ्या फीला-पुस्तकांना द्यायचा. आणि ती माउलीसुद्धां मला आपलाच मुलगा समजून पैसे द्यायची. लक्ष्मी, माझा विश्वनाथ होता म्हणूनच मला हे दिवस दिसले. आज विश्वनाथ कंगाल झालाय ! कुणीं नाहीं त्याचं या जगांत ! अशा या असहाय्य स्थितींत विश्वनाथाला दूर लोटूं ? नाहीं लक्ष्मी, मी माझ्या विश्वनाथाला कधींहि दूर लोटणार नाहीं-कधींहि दूर लोटणार नाहीं !

**लक्ष्मी** : तुम्ही यांना इथं ठेवून घेतलंत तर मी या घरांतून निघून जाईन.

**विश्वनाथ** : सखाराम सोड मला ! वहिनी, रागावूं नका हो या गरिबा-वर ! नाहीं मी इथं राहाणार नाहीं. जातों मी. सुखानं संसार करा तुम्ही !

**लक्ष्मी** : तुमचा आशिर्वाद नको आहे मला ! मी सुखानं राहीन नाहीं तर दुःखानं तडफडून मरेन या घरांत ! पण तुम्ही एक क्षणभरही इथं राहूं नका ! जा इथून ! ( घरांत जाते )

**सखाराम** : ( असहाय्यपणें ) लक्ष्मी ! ( थोड्या वेळानं ) विश्वनाथ, क्षमा कर हं मला ! माझ्या घरांत तुझा असा अपमान व्हायला नको होता.

**विश्वनाथ** : माझा अपमान झाला म्हणून क्षमा मागतोस तूं माझी ? अरे ज्या दिवशीं या विश्वनाथानं रस्त्यावर उभं राहून भीक मागितली त्याच वेळीं तो मेलेला. त्या मेलेल्या माणसाची कशाला क्षमा मागतोस ?

**सखाराम** : विश्वनाथ, असं बोलूं नकोस. मी तुला वाटेल ती मदत करीन.

**विश्वनाथ** : माझ्यावर तुला उपकारच करायचे असतील, तर मी लवकर कसा मरेन तें सांग !

**सखाराम** : विश्वनाथ !

**विश्वनाथ :** मला माझा–जगाचा अगदीं वीट आलाय. जिवंतपणीं मरणाच्या यातना मला आतां सहन होत नाहींत रे सखाराम ! मला सहन होत नाहींत ! मला जगवण्यापेक्षां, तुझ्या प्रेमळ हृदयांत क्षणभर काळाची कठोरता आणून माझा गळा दाबून...

**सखाराम :** पुरे पुरे विश्वनाथ, आतां आणखी माझा अंत पाहूं नकोस. सैतानाला ज्या गोष्टी सांगायच्या त्या या तुझ्या सखारामला सांगतोस. ऐक ! आजपासून माझं सर्वस्व तुझं आहे. ( आईच्या फोटोकडे पहात ) माझ्या आईच्या स्मृतीला साक्ष ठेवून सांगतों–माझ्या जिवाचं मोल देऊन मी माझ्या विश्वनाथला सुखी करीन.

**विश्वनाथ :** सखाराम !

( पडदा पडतो ).



# २

[ सखारामच्या घरांतील बैठकीची जागा. सखाराम पत्र लिहीत आहे. थोड्या वेळानं पत्र पाकिटांत घालून पत्ता लिहितो. एवढ्यांत बाळाजीपंत येतो. वय पन्नास–पंचावन वर्षं. धोतर, सदरा, डोक्यास गंध ही त्याची वेषभूषा. त्याच्या हातांत लहान लोटी आहे. ]

**सखाराम :** या, या बाळाजीपंत !

**बाळाजी :** ( हंसत ) म्हटलं भेटतोस कीं नाहीं घरीं ! पण भेटलास एकदांचा !

**सखाराम :** बसा–बसा !

**बाळाजी :** ( बसतो. ) कुणाला पत्र लिहितोस ?

**सखाराम :** माझा एक मित्र आहे मिरजजवळच्या वानलेसवाडीच्या हॉस्पिटलमध्यें, त्याला पाठवतोंय पत्र !

**बाळाजी :** मिरजजवळच्या हॉस्पिटलमध्यें ? म्हणजे तें आपलं–टी· बी. हॉस्पिटलमध्यें तर नाहीं ना ?

**सखाराम :** हो तिथंच !

**बाळाजी :** वय काय आहे तुझ्या त्या मित्राचं ?

**सखाराम :** असेल तेहतीस, चौतीस वर्षं !

**बाळाजी :** म्हणजे तरुण च आहे. हे अलिकडचे तरुण अगदीं बेजबाबदार असतात. उगाच जाग्रणं करतील, वेळेवर जेवायचे नाहींत, चहा ढोसतील, सिगारेटी फुंकतील आणि शेवटीं त्याचे परिणाम हे असे होतात.

**सखाराम :** नाहीं हो, माझा मित्र तसा नाहीं. साधा–भोळा अगदीं निर्व्यसनी आहे तो !

**बाळाजी :** अरे वरून साध्या–भोळया निर्व्यसनी दिसणाऱ्या माणसांना आंतून किती भयंकर व्यसनं असतात, तें तुम्हां आम्हांला नाहीं समजायचं. जाऊं दे तें ! कुठूनहि एकदां बरा होऊं दे हीच आम्हां पामरांची प्रभूच्या चरणीं प्रार्थना ! आणखी काय करणार आम्हीं !

**सखाराम :** हो–खरं आहे तें !

**बाळाजी :** ऐकलंस का सखाराम, अशासाठीं आलों होतों मी––

**सखाराम :** कशासाठीं हो ?

**बाळाजी :** ( आश्चर्यानें ) तुला माहीत नाहीं ?

**सखाराम :** काय ?

**बाळाजी :** अरे, दहा–बारा दिवस आहेस कुठं तूं ? किती माणसं येऊन गेलीं माझ्या घरीं ?

**सखाराम :** व्याजी पैसे न्यायला कीं काय ?

**बाळाजी :** छे छे छे ! अरे काय म्हणतोस तूं हें ? तें रोजंचच रामायण आहे. अरे, पंधरा दिवसांपूर्वी मी तीर्थयात्रा करून नाहीं का आलों. काशी, गया, प्रयाग, त्रिंबकेश्वर, रामेश्वर, पंढरपूर, नाशिक. अरे, एक तीर्थक्षेत्र ठेवलं नाहीं. गंगा, यमुना, कृष्णा, कावेरी सगळीं तीर्थं या लोटींत मिक्स केलेलीं आहेत. या तीर्थापायीं आणि दानधर्म वगैरे मिळून, थोडा थोडका नाहीं बरं का सखाराम, हजारावर खर्च आलाय मला !

**सखाराम :** हजारावर रुपये खर्च करून, शेवटीं एवढं लोटीभर तीर्थंच घेऊन आलांत तुम्ही ?

**बाळाजी :** लोटीभर नाहीं, चांगलं तांब्याभर तीर्थ आणलंय. आहेस कुठं ? आपल्या वाड्यांतलीं–बाहेरचीं बहुतेक सगळीं माणसं मला भेटून तीर्थ–प्रसाद खाऊन गेलीं. तूंच एक राहिला होतास. एकदां निरोपहि पाठवला होता तुला; पण तूं कांहीं आला नाहीस. कामामुळं तुला यायला

मिळत नसेल! म्हटलं आपणच जावं आज! पुढं ये पाहूं! देवाचं नांव घेऊन तीर्थ प्राशन कर. प्रसादही देतों तुला!

**सखाराम :** तुम्ही आणलेलं हें पंधरा दिवसांपूर्वीचं पाणी आहे नाहीं का?

**बाळाजी :** अरे पाणी काय म्हणतोस, तीर्थ म्हण! महातीर्थ—उगाच कांहीं तरी बोलूं नकोस. पुढं ये पाहूं आधीं. हात पुढं कर. (तीर्थ द्यायला जातो.)

**सखाराम :** मला नको आहे हें!

**बाळाजी :** तुला नको? तूं हें तीर्थ पिणार नाहींस? अरे सखारामा! माणसांतून उठल्यासारखा काय बोलतोस? पूर्वपुण्याईशिवाय तीर्थयात्रा घडत नाहीं. निदान दुसऱ्यानं आणलेलं तीर्थ पिऊन, प्रसाद खाऊन तरी माणसानं पुण्य जोडावं.

**सखाराम :** पापपुण्याच्या माझ्या कल्पना अगदीं निराळ्या आहेत, बाळाजीपंत!

**बाळाजी :** म्हणजे आम्ही तीर्थयात्रा करणारे तुझ्या दृष्टीनं गाढव लोक आहोंत तर! नको पिऊंस तीर्थ!

**सखाराम :** तीर्थयात्रा करणं हा तुमच्या मनाचा प्रश्न आहे आणि पंधरा दिवसांपूर्वीचं खराब झालेलं पाणी पिणं, न पिणं हा माझ्या मनाचा प्रश्न आहे.

**बाळाजी :** तुझा कसला प्रश्न? तुमच्यासारख्या लोकांनीं देवधर्म सोडलाय म्हणूनच आम्हांस हे असे दिवस आलेत.

**सखाराम :** अहो, तुमचे दिवस फार चांगले आहेत. व्याजी पैसे लावून गरगरून व्याज वसूल करताहांत. हजारों रुपये खर्चून तीर्थयात्रा करताहांत. तुम्हांला हो कसले वाईट दिवस आलेत?

**बाळाजी :** थट्टा करतोस माझी तूं, थट्टा करतोस. बरं नाहीं हं सखाराम हें! माणसानं सर्व कांहीं करावं पण देवधर्म सोडूं नये.

**सखाराम :** शाबास—शाबास. बाळाजीपंत! सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखे बोल बोललांत! माणसानं सर्व कांहीं करावं पण देवधर्म सोडूं नये. माणसानं माणसांना फसवावं; लुबाडावं; वाटेल त्या मार्गानं त्यांना माणसांतून

उठवावं; त्यांचे संसार उध्वस्त करून त्यांच्या अन्नांत निर्दयतेनं माती कालवावी; पण धर्मानं वागल्याचं नेहमीं ढोंग करावं! तीर्थयात्रा–दानधर्माचं नाटक करून, आरशांतल्या आणि देवळांतल्या गरीब बिचाऱ्या देवांच्या डोळ्यांत धूळ फेकत राहावें, म्हणजे अगदीं निर्धास्तपणें स्वर्गात जाऊन लाडू जिलबीवर आडवा हात मारायला मिळतो! असंच ना?

**बाळाजी** : अरे, देव आणि धर्म हे शब्दहि उच्चारण्याची तुझी योग्यता राहिलेली नाहीं.

**सखाराम** : चुकताहांत तुम्हीं! मी धर्मानं वागतों आणि देवाचीहि पूजा करतों.

**बाळाजी** : इतक्या दुरून जपून आणलेलं हें पापक्षालक तीर्थ आणि हा पुण्यवर्धक प्रसाद तूं खात नाहींस, तो तूं धर्मानं काय वागणार आणि देवाची कसली पूजा करणार?

**सखाराम** : बाळाजीपंत, माणुसकी हा माझा धर्म आणि असहाय्य जीवांना यथाशक्ति साहाय्य करणं हीं माझी देवपूजा! तशीच मला एका गरीब देवाची पूजा करायची होती; म्हणून पंधरा दिवसांपूर्वी मी तुमच्याकडे पैसे मागितले होते. पण तुम्ही माझ्याकडे सोन्याचा दागिना मागितलात. मी द्यायला असमर्थ होतों. माझं घर होतं. आजुबाजूची चार हाताची जमीन होती. पण फक्त तुम्हांला सोनं पाहिजे होतं. मीं तुम्हांला सर्व परिस्थिति समजावून सांगितली. पण तुम्ही माझ्या सज्जनपणावर काडीइतकाहि विश्वास ठेवला नाहीं. एक पैसा सुद्धां तुम्ही मला दिला नाहींत. पण पंधरा दिवसां-पूर्वी तीर्थयात्रेपायीं हजारावर रुपये खर्चून आलांत तुम्ही! अहो बाळाजीपंत, तेच पैसे औषध–पाण्यावांचून तडफडणाऱ्या आपल्या गरीब शेजाऱ्या—पाजाऱ्यांसाठीं खर्च केले असतेत, शिकण्याची इच्छा असूनहि गरिबीमुळं ज्यांना शिक्षण घेतां येत नसेल, अशा एखाद्या हुषार विद्यार्थ्याच्या शिक्षणासाठीं ते पैसे खर्च केले असतेत, तर त्या तुमच्या पैशाचं सार्थक झालं असतं. माझ्या दृष्टीनं खरा धर्म आणि देवपूजा ती आहे! समजलांत? जा तुम्ही! भोळ्या–भाबड्या गरीब जिवांच्या असहाय्यतेचा फायदा घेऊन, त्यांना लुबाडण्याचा तुमचा सज्जन धंदा असाच चालू ठेवा! देव [redacted] करील.

**बाळाजी :** म्हणजे देव माझं वाटोळं करील असाच तुझ्या म्हणण्याचा अर्थ ना ? कळतंय मला, उलटा बोलतोयस तूं ! अरे, पण तुझ्यासारख्या कावळ्याच्या शापानं बैल कांहीं मरायचे नाहींत. देवपूजा, दानधर्म, तीर्थयात्रा करून मी इतकं पुण्य जोडलंय, कीं माझं सर्व कांहीं अगदीं सुरळीत चाललंय. तशीच वेळ आली, तर गांवांतील लोकांना सन्मार्गाला लावण्यासाठीं, देवाचं नाहीं तर कुठल्या तरी बाबाचं देऊळहि बांधीन मी ! समजलास ? जातों मी ! ( जाऊं लागतो. )

**सखाराम :** थांबा हं जरा, आल्यासारखा चहा घेऊन चला !

**बाळाजी :** इतक्या प्रेमानं आणलेलं तीर्थ तूं प्याला नाहींस, तो तुझ्या हातचा पापी चहा पिऊं ? अरे चहा काय, यापुढं पाणीहि पिणार नाहीं तुझ्या हातचं ! नास्तिक, अधर्मी ! श्रीहरी ! श्रीहरी !! ( जातो. सखाराम कोट–टोपी घालून बाहेर जाऊं लागतो. बाहेरून राजन व विमल येतात. )

**सखाराम :** या, या ! बसा ! कुठून आलांत आपण ?

**विमल :** पलिकडच्या वाड्यांत राहातों आम्हीं. लक्ष्मीला भेटायला आलेंय मी !

**राजन :** आणि मला सखारामभाऊंना भेटायचंय ! पंधरा दिवसांत दोनदां येऊन गेलों आम्ही, पण ते कांहीं भेटले नाहींत. उद्यां मी मुंबईला जाणार आहें; तेव्हां कोणत्याहि परिस्थितींत आज त्यांची भेट घ्यायचीच असं ठरवून आलोंय मी. आपण सखाराम भाऊंचे थोरले भाऊ वाटतं ?

**सखाराम :** नाहीं–नाहीं, माझंच नांव सखाराम !

**राजन :** चला ! थट्टा करतां काय आमची ! त्या दिवशीं सखाराम-भाऊंच्या सौभाग्यवतीनं सांगितलं कीं, सखारामभाऊ माझ्यासारखेच अपटुडेट राहातात म्हणून !

**सखाराम :** गंमतीनं म्हणाली असेल ती !

**राजन :** अस्सं ? म्हणजे आपणच सखारामभाऊ तर ?

**सखाराम :** हो ! काय काम होतं आपलं माझ्याशीं ?

**राजन** : नाहीं म्हणजे तसं कांहीं नाहीं. इथं आल्यासारखं आपल्याला भेटावं व आपली ओळख व्हावी एवढंच ! माझं नांव राजन आणि ही आमची सौभाग्यवती !

**सखाराम** : हो का ! थांबा हं ! लक्ष्मी ! हे बघ आपल्याकडे पाहुणे आलेयत.

**लक्ष्मी** : ( बाहेर येऊन अस्थिरपणें ) कोण विमल ? तुम्ही आलांत !

**राजन** : ( हंसत ) हो आतांच आलों आम्ही !

**सखाराम** : ( कृत्रिमपणें हंसत ) हे बघ लक्ष्मी, पाहुण्यांना आधीं चहा करून दे पाहूं !

**लक्ष्मी** : ( सखारामकडे न पहातां शांतपणें ) देतें हं !

**सखाराम**:—मी जरा बाहेर जाऊन येतों. आमची लक्ष्मी तुम्हांला कांहीं कमी पडूं द्यायची नाहीं. जातों हं मी ! मुंबईला गेलांत कीं पत्र पाठवायला विसरूं नका हं ! ( जातो. )

**लक्ष्मी** : बसा हं ! आधीं चहा घेऊन येतें. पाणी उकळलेलंच आहे. साखर व पावडर टाकली कीं पांच मिनिटांत चहा तयार होईल.

**राजन** : नको; चहा नको. ग्लासभर थंडगार पाणी घेऊन या ! सकाळपासून खूप चहा झालाय नाहीं ग ?

**विमल** : हो हो ! लक्ष्मी खरंच नको चहा !

**लक्ष्मी** : अग मी दिलेल्या कपभर चहानें कांहीं तुझीं हाडं वर यायचीं नाहींत. काय पण नवरा-बायको एकमेकांच्या सुरांत सूर मिळवताहेत !

**राजन** : सखारामभाऊ आणि तुम्ही बाहेर गेल्यावर असं आमच्यासारखं बोलत नाहीं वाटतं ?

**लक्ष्मी** : आम्हीं ना, हो हो ! तुमच्यापेक्षांहि मोकळेपणानं बोलतों. आतां त्यांना बाहेर जायचं होतं म्हणून ! नाहीं तर तुमच्याशीं किती किती

बोलत राहिले असते. घरीं जायची सुद्धा तुम्हांला आठवण राहिली नसती त्यांच्या बोलण्यापुढं ! नाहीं ग विमल ?

**विमल** : हो हो !

**लक्ष्मी** : आधीं चहा घेऊन येतें. मग बोलूं या आपण ! ( घाईनं घरांत जाते. )

**राजन** : ( गंभीरपणें ) भयंकर आहे !

**विमल** : काय ?

**राजन** : तुझ्या मैत्रिणीचा संसार आणि तिचं जीवन !

**विमल** : खरं आहे.

**राजन** : मला वाटलं होतं, सखारामभाऊ दिसायला सुंदर नसले तरी माझ्या वयाचे असतील. तूं तरी मला सांगायचं नाहींस ?

**विमल** : काय सांगूं मी तुम्हांला ! खरं म्हणजे सखारामभाऊंची आणि तुमची भेटच होऊं नये असं मला वाटे !

**राजन** : कां ?

**विमल** : सखारामभाऊंविषयीं तुम्ही निराळीच कल्पना केली होती, त्या तुमच्या कल्पनेला कधीं धक्का लागूं नये असं मला वाटे ! पहिल्या दिवशीं आम्ही आलों होतों तेव्हां लक्ष्मी तुमच्याशीं खोटं बोलली होती.

**राजन** : तेव्हां खोटं बोलली. आतांहि खोटं बोलली. पण तिच्या मनाच्या यातना तोंडावर स्पष्ट दिसत होत्या. आनंदी व सुखी असल्याचा नुसता तोंडावरचा फसवा अभिनय करीत होत्या त्या !

**विमल** : नाहीं तर काय करणार ? दोघेहि संसारांत सुखी आहोंत असं दुसऱ्यांना भासवीत आहेत; पण दोघंहि दोघांची फसवणूक करताहेत. एका ठिकाणीं असून दोघंहि एकमेकांपासून मनानं दूर, दूर आहेत.

**राजन** : कुठवर चालणार हें असं ?

**विमल** : खरंच कुठवर चालणार हें असं ? एखाद्याच्या आयुष्यांत हंसतां, हंसतां मनासारख्या गोष्टी घडतात तर कुणाच्या आयुष्यांत अशा

गोष्टी घडतात, कीं त्या त्याला जन्मभर रडत ठेवतात. तेंच आयुष्य माझ्या लक्ष्मीच्या वांट्याला आलंय. केव्हां केव्हां मला वाटतं, असं आयुष्य माझ्या वांट्याला आलं असतं तर मी काय केलं असतं ? तुम्ही काय केलं असतं ?

**राजन** : खरंच, मन भेदून सोडणारा प्रश्न आहे हा !

**विमल** : लहानपणापासून आम्ही जिवाभावाच्या मैत्रिणी; त्यांतली एक सुखी झाली आणि दुसरी दुःखी आहे, कायमची ! माझा नवरा म्हणून किती अभिमानानं तुमच्याकडे बोट दाखवतें मी ! त्यावेळीं माझं मन बेहोशून जातं. पण बिचारी लक्ष्मी, हा माझा नवरा म्हणून कुणाला सांगतांना तिच्या मनाला कितीं यातना होत असतील ?

**राजन** : सखारामभाऊंना हें समजायला पाहिजे होतं. वरून संतासारखीं शांत दिसणारीं हीं माणसं मनानं इतकीं दुष्ट असतात कीं, स्वतःच्या सुखासाठीं दुसऱ्याच्या सोन्यासारख्या आयुष्याची माती करतांना यांना थोडीसुद्धां लाज वाटत नाहीं. येऊं देत सखारामभाऊंना, त्यांच्या तोंडावर मी विचारणार, कां तुम्ही एका निष्पाप स्त्रीच्या आयुष्याचा नाश केलात ? जोंपर्यंत तुमच्यासारखीं स्वार्थी माणसं समाजांत आहेत तोंपर्यंत समाज कधींहि सुखी होणार नाहीं. चांगले कोरडे ओढतों त्यांच्यावर !

**विमल** : नुसत्या कोरड्या व्याख्यानांनीं हा प्रश्न सुटणार आहे थोडाच ! दोघांच्या सहानुभूतीनं, एकमेकांचं मन ओळखण्यानंच हा प्रश्न सुटेल. मला माहीत आहे, सखारामभाऊ प्रेमळ आहेत; सज्जन आहेत.

**राजन** : सज्जन आणि प्रेमळपणा काय चाटायचाय आतां ?

**विमल** : मला कळलंय कीं, आईच्या इच्छेसाटींच त्यांनीं हें दुसरेपणाचं लग्न केलंय.

**राजन** : प्रत्येक गुन्हेगार कोणत्या ना कोणत्या कारणाआड आपला गुन्हा लपविण्याचा नेहमीं प्रयत्न करीत असतो. आईच्या इच्छेसाठीं सखारामभाऊंना लग्नच करायचं होतं, तर त्यांच्या वयाला शोभेल अशा एखाद्या स्त्रीशीं लग्न केलं असतं, तर आज झाली तशी दुर्दशा त्यांच्या संसाराची कधींच झाली नसती.

**विमल :** होऊन गेलेल्या गोष्टीवर आतां उगाच वादविवाद करण्यांत काय अर्थ आहे? हा अनर्थ थांबविण्याची एकच वेळ होती. लक्ष्मीनं या लग्नाला विरोध केला असता तर आज तिच्यावर रडत आयुष्य कंठण्याची कधींच वेळ आली नसती.

**राजन :** पण तुम्ही बायका जुलमाच्या वेळीं गप्प बसतां आणि जन्मभर अशा रडत राहातां. तुम्हांला खूष करण्यासाठीं ढोंगी पुरुषांनीं पतिव्रता, माता, देवता, जगत्‌जननी म्हणून तुमच्यावर स्तुतीचा वर्षाव केला, कीं दुःखालाच भोळसटपणें सुख मानून तुम्ही जगत असतां. असल्या बायकांचा मला इतका राग येतो म्हणून सांगूं –

**लक्ष्मी :** ( चहा घेऊन येते ) आणि त्या बायकांनीं तुमच्या रागापेक्षांहि अस्सा गरम चहा करून दिला, कीं तुम्हीं पुरुष तो राग थंडपणें चहाबरोबर पिऊन टाकतां. ( सर्व हंसतात. )

**राजन :** खरं आहे, ( चहा घेतो. )

**लक्ष्मी :** इतके कां चिडलांत तुम्ही गरीब बिचाऱ्या बायकांवर?

**विमल :** ( चहा पितां पितां ) चिडले नाहींत ते! गंमतीनं बोलत होते. मी यांना सांगत होतें, पंधरा दिवसासाठीं तुला आणि सखारामभाऊंना मुंबईस घेऊन जायचं!

**राजन :** तेव्हां मी म्हणालों, "सखारामभाऊ कांहीं यायचे नाहींत. आपण लक्ष्मीलाच घेऊन जाऊं या मुंबईला!"

**विमल :** तेव्हां मी म्हणालें, "सखारामभाऊ परवानगी द्यायचे नाहींत; आणि लक्ष्मी कांहीं एकटी यायची नाहीं." त्यावरूनच यांनीं बायकांच्या दुबळेपणावर कोरडे ओढण्यास सुरुवात केली.

**लक्ष्मी :** इथं येऊन पंधरा दिवस झाले नाहींत तोंच मुंबईला जाण्याच्या गोष्टी बोलूं लागलांत तुम्हीं?

**राजन :** मुंबईहून पत्र आलंय. गेलंच पाहिजे मला!

**लक्ष्मी :** इतक्या लवकर कशाला जातां? आल्यासारखे राहाना आणखी आठेक दिवस!

**राजन :** त्याचं असं आहे, आमच्या ऑफिसचं आहे नाटक ! अर्थात हिरोची भूमिका आणि संगीत दिग्दर्शन मीच करणार आहें. अशा कांहीं मस्त चाली लावल्यात !

**लक्ष्मी :** म्हणा तरी तुमच्या नाटकांतलं गाणं !

**विमल :** कशाला म्हणायला सांगतेस ? यांच्या बेसूर आणि बेतालें गाण्यानं माझं तर डोकं उठतं बाई !

**राजन :** डोकं उठायला तें जाग्यावर पाहिजे ना ! आणि त्या डोक्यांत कलावंताचा मेंदू पाहिजे माझ्या गाण्याचं रसग्रहण करायला.

**विमल :** कसलं रसग्रहण ? यांचं गाणं चालू झालं कीं खग्रास ग्रहण लागतं माझ्या डोक्याला !

**लक्ष्मी :** कशाला उगाच हिणवतेस त्यांना !

**राजन :** स्वतःच्या बायकोनं हिणवलं म्हणून मी नर्व्हस होणारा नवरा नाहीं. आतां मी दुप्पट उत्साहानं गाणं म्हणणार. आम्हीं बसवीत असलेल्या " पराभव " नाटकांत नायिकेचं मनाविरुद्ध लग्न झालेलं असतं. आपल्या आयुष्यांतला एकेक क्षण तिला युगायुगासारखा वाटत असतो. त्या दुःखांतहि ती दुसऱ्यांना सुखी करण्याचा आटोकाट प्रयत्न करते. पण दुःखावेग असह्य झाला कीं तिच्या तोंडून शब्द उमटूं लागतात—

वाटे जेव्हां उदास जीवन,
तेव्हां होते तुझी आठवण
गत कालाचे क्षण आठवती,
जशा सागरी लहरी उठती
सुखद स्मृति त्या मनीं टोंचती,
आज जळालें तें नंदनवन !

( राजन गाणें म्हणत असतां, लक्ष्मी हताशपणें गाणं ऐकत असते. गाणं संपल्यावर )

...४...

**राजन :** अशा एकापेक्षां एक मस्त चाली लावल्या आहेत गाण्यांना !

**लक्ष्मी :** गाणं चांगलं आहे आणि त्याला चालहि चांगली लावलीत तुम्ही !

**राजन :** मग ? गाण्याच्या भावनेप्रमाणं चाली लावण्यांत पटाईत आहें मी ! थेट नाटककाराच्या आत्म्याच्या काळजालाच हात घालतों मी ! कांहीं बावळट नाटककार मला म्हणतात ना, " आम्हांला कल्पना नव्हती इतक्या भावनाप्रधान चाली काढल्यात तुम्ही राजन ! "

**विमल :** ऐकलंस का लक्ष्मी, यांच्या या बेसूर गाण्यामुळं का होईना यांचा एक मोठा फायदा झालाय.

**राजन :** ए, बेसूर गाणं म्हणूं नकोस हं !

**लक्ष्मी :** हिच्या बोलण्याकडे लक्ष देऊं नका. कसला फायदा झालाय यांचा ?

**विमल :** नाटकाच्या जाग्रणानं यांनीं ऑफिसला दांडी मारली, तरी यांचा ऑफिसर यांना कधीं दम भरीत नाहीं.

**राजन :** पण तोच ऑफिसर वर्ष–दोन वर्षांनीं आपल्या घरीं बारशाला माझं फुकट गाणं ठेवून माझा चांगला दम काढतो त्याची वाट काय ! ( विमल–लक्ष्मी हंसतात ) माझ्यासारख्या रेडिओस्टारला बारशाला फुकट गायला लावतो लेकाचा.

**विमल :** चार–पांच वेळां रेडिओवर गाइलांत म्हणून संगीत शिरोमणी नाहीं झालांत ! अजून पुष्कळ राग शिकायचेत तुम्हांला.

**राजन :** ए, मी पुढं राग शिकेन नाहीं तर शिकणार नाहीं. पण तूं मला अक्कल शिकवूं नकोस. राग आला तर अशी ठेवून देईन ! भैरवी गायला लावीन इथं !

**लक्ष्मी :** असलं कांहीं इथं करूं नका हं ! घरीं जाऊन खुशाल मारीत बसा एकमेकांना.

**विमल** : हे मला मारणार ? मुंबईला असतांना असंच कांहीं तरी झालं होतं आणि हे माझ्यावर रागावले आणि त्या रागाच्या भरांत, हातांत हंटर घेऊन मला मारायला आले.

**लक्ष्मी** : तुला मारायला हंटर घेतला यांनीं ?

**विमल** : मुद्दाम घेतला नाहीं, कुठल्याशा नाटकांत आयत्या वेळीं फौजदाराची भूमिका केली होती यांनीं. त्याची नाइट दिली नाहीं म्हणून हंटर मारून आणला यांनीं गुपचूप ! तो त्यावेळीं हातांत घेऊन म्हणाले, " मारूं ! मारूं ! ! फोडून काढतों तुला आतां. मारूं काय ?" असं उगाच बडबडत हवेंतल्या हवेंत फाड–फाड आवाज काढीत होते हंटरचे !

**लक्ष्मी** : काय हो खरं का हें ?

**राजन** : ( गंभीरपणें ऐतिहासिक पात्राच्या पोझमध्यें ) कडव्या शत्रूला रणांगणांत दे माय धरणी ठाय करणाऱ्या आमच्यासारख्या निधड्या छातीच्या रणधुरंधरांनीं गरीब अबलेवर हात टाकण्याचा भेकडपणा केला, तर तो आमच्या पौरुषाच्या पोझिशनला कसा बरं शोभून दिसेल ? म्हणून हंटरचे हवेंत आवाज काढून मी हिला आहिंसक दरारा दाखवीत होतों. ( स्वतःच मोठ्यानं हंसतो. लक्ष्मी, विमल हंसतात ).

**विमल** : ऐकलंस ! अस्सं हें यांचं नेहमीं नाटक चाललेलं असतं. कधीं जेवणाला उशीर झाला, तर हे ऐतिहासिक नाटकांतल्या राजासारखी पोझ घेऊन म्हणतील, ( राजनची नक्कल करीत ) 'राणी सरकार, आज भोजनाला उशीर कां बरं झाला ? कांहीं दगा–फटका तर नाहीं ना ?'

**लक्ष्मी** : म्हणजे ग काय ?

**विमल** : म्हणजे माझं डोकं दुखतंय का ? सर्दी झालीय का ? कीं ताप आलाय ? असा त्या दगा–फटक्याचा अर्थ !

**लक्ष्मी** : ( हंसत ) अस्सं होय ! मग तुला आपलं घरबसल्या रोज फुकट नाटक बघायला मिळतं तर !

**विमल** : कांहीं विचारूं नकोस. कुठलं तरी नाटक घेऊन येतील आणि म्हणतील, 'जरा उभी रहा हं स्त्री भूमिकेसाठीं !' एकदां मी तशी उभी राहिलें, तर हे एकदम माझ्या पायां पडून कळवळून म्हणाले, " आई, आई, या तुझ्या बाळाला क्षमा कर ! मी चुकलों ग आई ! मी तुला छळलं. मी पापी आहें ग आई !! " असं म्हणून माझ्या पायावर तडातड डोकं आपटूं लागले. मला असा राग आला, यांच्या डोक्यावर अशी थप्पड मारली तेव्हां धडपडत उठत मला म्हणाले, " अग तें नाटकांतलं भाषण ! " ( लक्ष्मी–राजन हंसतात. ) अग एकदां तर यांनीं कहरच केला.

**लक्ष्मी** : काय केलं ग ?

**विमल** : रात्रीं दहा–साडेदहाला कुठून तरी आले आणि मला म्हणाले, " उभी रहा ! मला जरा नाटकाची तालीम करायची आहे ! " मी उभी राहिलें आणि म्हटलं, " बोला आतां ! " तेव्हां म्हणाले, " थांब, मूडमध्यें येतों मी ! " आणि पांच मिनिटांनीं असा कांहीं अक्राळविक्राळ चेहरा करून ओरडले, " चांडाळणी मला तोंड दाखवूं नकोस. जा नीघ इथून ! नाहीं तर तुझा गळा दाबीन. तुझ्या नरडीचा घोट घेईन. फांशी गेलों तरी बेहत्तर ! " आणि असे कांहीं राक्षसासारखे खदखदां हंसले. अग सबंध बिल्डिंगमधले लोक धांवत आमच्या खोलीवर आले. तसे हे लाइट काढून झोंपल्याचं सोंग करून पडून राहिले. दरवाजा उघडून मला लोकांना सांगावं लागलं, " मला नाहीं बोलले ते, झोपेंत बरळताहेत ". ( सर्व हंसतात. ) तेव्हां सर्व लोक खो–खो हंसत आपापल्या खोलींवर गेले. असलीं यांचीं एकेक नाटकं !

**राजन** : त्याचं असं आहे, मी आहें जरा खिलाडू वृत्तीचा कलावंत ! गाणं–नाट्य–नाट्यशास्त्र–तंत्र–टेंपो–मूड हिला कांहीं समजत नाहीं. गांवढळच आधीं कशी झाली तरी ! लग्न झाल्यापासूनच थोडीशी सुधारली.

**विमल** : मी सुधारलें पण तुम्ही मात्र दिवसेंदिवस अर्धवट होत चालला आहांत !

**राजन** : अर्धवट बायको मिळाली, कीं त्याचा नवऱ्यावर थोडा फार परिणाम व्हावयाचाच ! ( घाईनं ) जाऊं दे तें ! आम्ही जातों आतां. उद्यां मुंबईला जायचंय; थोडी खरेदी केली पाहिजे.

**लक्ष्मी :** उद्यां नक्की जाणारच ?

**राजन :** गेलंच पाहिजे. मी नसलों तर नाटकच बसायचं नाहीं मुळीं ! काय असेल तें असो, उपजतच माझ्या फिगरमध्यें असं कांहीं ॲट्रॅक्शन् आहे. मी असलों कीं सर्व नट–नटी रीहर्सलला रेग्युलर हजर राहातात. म्हणून मला गेलंच पाहिजे. नाहीं तर ते नाटकवाले माझ्या नांवानं उगाच कोकलत बसायचे.

**लक्ष्मी :** मला वाटलं होतं आणखी थोडे दिवस राहाल तुम्ही इथं !

**राजन :** पुढं येईन तेव्हां अगदीं चांगला महिनाभर तरी राहीन इथं ! त्या अगोदर मात्र तुम्ही आणि सखारामभाऊ आमच्याकडे मुंबईला या हं ! जातों मी. चल ग ! सखारामभाऊंना रामराम सांगा माझा !

**विमल :** तुम्हीं चला हं पुढं ! आलेंच मी !

**राजन :** जातों हं ! ( जातो, थोडा वेळ दोघी स्तब्ध राहातात. नंतर. )

**विमल :** लक्ष्मी !

**लक्ष्मी :** काय ?

**विमल :** ( गहिंवरून ) पाहिलंस, कांहीं धडपड न करतां संसारसुख हंसत खेळत माझ्या हातीं आलं. पण पराकाष्ठा करूनहि तें सुख तुझ्यापासून दूर-दूर गेलं. अगदीं कायमचं दूर गेलं. फक्त दुःखच तेवढं तुझ्या वांट्याला आलं. पण लक्ष्मी, कोणत्याहि परिस्थितींत मनाचा तोल सुटूं देऊं नकोस. उपदेश करीत नाहीं मी तुला ! तूं कशीहि राहा. पण तुला कुणी नांवं ठेवलेलीं मला ऐकवणार नाहींत ग !

**लक्ष्मी :** नाहीं विमल, कधींहि मनाचा तोल सुटूं देणार नाहीं मी !

**विमल :** जातें मी !

**लक्ष्मी :** उद्यां भेट घेऊन बंदरावर येईन तुला पोहोंचवायला.

**विमल :** हं, ये ! सखारामभाऊंना सांग आम्ही गेलों म्हणून ! जातें हं ! ( पदरानं डोळे पुशीत जाते. विमल गेली तिकडे लक्ष्मी शून्य दृष्टीनं पहाते. नंतर— )

**लक्ष्मी :** तशी नव्हे, मी, सखे, खरोखर
अभंग राहिन अशिच निरंतर
सहजच ओठीं धरूनि प्याला
हंसत प्राशितें हलाहलाला
मोजित बसतें क्षणाक्षणाला
जीवनमरणा मधलें अंतर

( गाणं संपल्यावर लक्ष्मी घरांत जाते. थोड्या वेळानं सखाराम आणि विश्राम येतात. कोट–टोपी काढून ठेवतांना— )

**सखाराम :** वाटेंत भेटल्यापासून इथं येईपर्यंत तुम्हांला एक गोष्ट सांगायची असं म्हणता आहांत, पण अजूनपर्यंत तुम्ही मला कांहींच सांगितलेलं नाहीं.

**विश्राम :** मुद्दामच ती गोष्ट सांगायची मी टाळाटाळ करीत होतों. इथं तुमच्या घरीं आल्यानंतर ती गोष्ट मला तुम्हांला सांगावयाची होती.

**सखाराम :** बसा ! ( दोघे बसतात. ) सांगा काय सांगायचं असेल तें !

**विश्राम :** सज्जन माणूस कुणाला म्हणावं ?

**सखाराम :** ( आश्चर्यानें पहात ) जो कधीं वाईट कृत्य करीत नाहीं, स्वतःबरोबर दुसऱ्याच्या सुखासाठीं झटतो त्यालाच सज्जन म्हणतात.

**विश्राम :** मी एकदां चोरी केली होती. त्याबद्दल मला दोन वर्षांची शिक्षा झाली होती. मी सज्जन माणसांत मोडेन ?

**सखाराम :** अजाणतेपणीं–अज्ञानानं तुम्ही चोरी केली असेल, आणि नंतर समज आल्यावर तुम्ही चांगल्या मार्गानं जात असाल तर तुम्ही सज्जनच ठराल !

**विश्राम :** मी अजाणतेपणीं–अज्ञानानं चोरी केलेली नाहीं. जाणतेपणीं–समजून उमजून, परिणाम ठाऊक असून चोरी केली. नंतर चांगलेपणानं वागण्याचा प्रयत्न करता पण तें कांहीं जमत नाहीं. सज्जन म्हणाल तुम्ही मला ?

**सखाराम** : जाणतेपणीं, समजून–उमजून परिणाम ठाऊक असून तुम्ही चोरी केली असेल आणि नंतरहि चांगलेपणानं वागण्याचा प्रयत्न करीत नसाल, तर तुम्ही समाजाच्या दृष्टीनं...

**विश्राम** : सज्जन नाहीं. असंच ना ?

**सखाराम** : हो हो, केव्हांहि !

**विश्राम** : माझ्यासारखी तुम्ही आतांपर्यंत कुणाची चोरी करून तुरुंगांत गेलां नाहींत. कुणाचं कधीं वाईट केलं नाहीं. दुसऱ्यावर नेहमीं तुम्ही उपकार करतां. अगदीं संत वृत्तीचे माणूस तुम्ही आहांत. तुम्हांला संत सखाराम अशी हांक मारायच्या योग्यतेला पोहोंचला आहांत असं मला...

**सखाराम** : तो मान नको आहे मला ! तशी हांक मारण्याची योग्यता नाहीं माझी ! मी एक साधासुदा गरीब—

**विश्राम** : सज्जन माणूस आहें असंच ना ?

**सखाराम** : हो, मी तसाच आहें.

**विश्राम** : अस्सं ! मग मी आपणांला आणखी एक प्रश्न विचारतों. समजा, माझी चाळीशी उलटून गेलेली आहे. बरेच केंस पिकलेले आहेत. मूळच्या दुबळ्या प्रकृतीमुळं चेहराहि खत्रूड दिसूं लागलाय. अशा स्थितींत मी एका अठरा–एकोणीस वर्षांच्या सुंदर मुलीशीं, तिच्या मनाविरुद्ध: लग्न केलं तर मी सज्जन ठरेन का ?

**सखाराम** : ( अडखळत ) हा–हा–प्रश्न—प्रत्येकाच्या ..अ...

**विश्राम** : कां, कां, एवढे अडखळलांत कशाला ? एका दुर्जन माणसानं विचारलेल्या प्रश्नाचं उत्तर देतांना, आपल्यासारखा सज्जन–संत वृत्तीचा माणूस अडखळतोय, कावराबावरा कां होतोय तेंच मला समजत नाहीं. ( मिस्किलपणें हंसतो. )

**सखाराम** : तो–तो प्रत्येकाचा वैयक्तिक प्रश्न आहे.

**विश्राम** : जाणतेपणीं, समजून उमजून चोरी करणारा माझ्यासारखा माणूस, समाजाच्या दृष्टीनं सज्जन नाहीं असं मोठ्या दिमाखानं सांगितलंत,

आणि मनाविरुद्ध लग्न करणं हा मात्र वैयक्तिक प्रश्न म्हणतां ? कमाल आहे तुमच्या सज्जनपणाची !

**सखाराम :** हे प्रश्न तुम्ही मला कां विचारता आहांत ? दुसऱ्या विषयावर बोलूंया आपण ! ( उठून ) थांबा हं ! पहिल्यानं चहा घेऊंया आपण ! ( चहा सांगायला जाऊं लागतो. )

**विश्राम :** ( उठून हास्य मुद्रेनं ) आणखी, मी तुम्हांला एक–दोन प्रश्न विचारले, कीं त्या चहांत वीष घालून या विश्रामला ठार मारावंसं वाटेल तुम्हांला !

**सखाराम :** मला काय राक्षस समजतां कीं काय ?

**विश्राम :** नाहीं, सज्जन–संत ! तुमचं वय काय ?

**सखाराम :** ( आश्चर्यानं पहात ) बेचाळीस वर्षे !

**विश्राम :** तुमच्या बायकोचं वय काय ?

**सखाराम :** कोर्टात उभ्या असलेल्या गुन्हेगारासारखे तुम्ही मला प्रश्न विचारता आहांत.

**विश्राम :** तुमच्या बायकोचं तुमच्यावर प्रेम आहे ?

**सखाराम :** ( त्रस्तपणें ) तुम्हांला काय करायचंय त्याच्याशीं ? हा–हा माझा खाजगी प्रश्न आहे.

**विश्राम :** ( किंचित् आवाज चढवून ) सज्जन माणसा, माझ्या प्रश्नाचीं सरळ उत्तरं दे !

**सखाराम :** तुम्ही असे कांहीं विचित्र प्रश्न विचारता आहांत कीं–

**विश्राम :** काळीज असलेला कुठलाहि सज्जन माणूस, माझ्या साध्या प्रश्नांचीं धडाधड उत्तरं देऊन मोकळा झाला असता. बरं लग्न झाल्यावर तरी तुमच्या बायकोचं दुसऱ्या कुणावर प्रेम असल्याचा तुम्हांला कधीं संशय आला होता का ?

**सखाराम :** माझ्या घरीं येऊन मलाच अपमानास्पद प्रश्न विचारता आहांत. या प्रश्नांचीं मी उत्तरं देऊं शकत नाहीं. जा तुम्ही !

**विश्राम :** जिच्याशीं आपण लग्न करणार आहोंत, त्या मुलीचं लग्नाअगोदर दुसऱ्या कुणा तरी तरुणावर प्रेम असल्याची साधी चौकशी तरी केली होती का तुम्ही ?

**सखाराम :** दोन्हीकडच्या मंडळींच्या संमतीनेंच लग्न झालं आमचं !

**विश्राम :** तुमच्या आणि मुलीच्या बापाच्या संमतीनं लग्न झालं. मुलीच्या संमतीनं नाहीं. अहो, त्या मुलीचं तर दुसऱ्याच तरुणावर प्रेम होतं !

**सखाराम :** दुसऱ्यावर प्रेम होतं ? कुणावर ?

**विश्राम :** विश्राम नांवाच्या तरुणावर !

**सखाराम :** म्हणजे ?

**विश्राम :** माझ्यावर !

**सखाराम :** खोटं सांगताहांत तुम्ही !

**विश्राम :** अगदीं खरं सांगतोंय.

**सखाराम :** तुमच्यावर माझा विश्वास नाहीं. खोटं सांगून आमच्या संसाराला आग लावूं पहाता आहांत तुम्हीं !

**विश्राम :** तुम्हीच तुमच्या हातानं लावलीत ती !

**सखाराम :** एखाद्याच्या निरपराध पत्नीवर घाणेरडे आरोप करण्याइतका पुरावा आहे का तुमच्याजवळ ?

**विश्राम :** ( शांतपणें पॅन्टच्या खिशांतून प्रेमपत्रें आणि फोटो काढतो ) हा पहा पुरावा. तुमच्या एका डोक्यांत मावणार नाहीं इतका भरपूर पुरावा माझ्या दोन्ही हातांत आहे. तुमच्या निरपराध पत्नीनं मला पाठवलेलीं हीं प्रेमपत्रें ! आणि आम्ही दोघांनीं चोरून काढलेले हे फोटो ! हीं प्रेमपत्रं वाचून पहायचींत ? फोटो चांगले निरखून पहायचेत ? ( सखाराम कावराबावरा होतो. ) मला वाटतं तेवढं धाडस तुम्हांला होणार नाहीं. तुमच्या पत्नीचे हे फोटो हातांत घेऊन पहातांना आणि हीं प्रेमपत्रं वाचतांना तुमच्या देहांतल्या सज्जन संताचा क्षणांत सैतान होऊन राक्षसी कृत्य करून तो मोकळा होईल. आतां तरी बसला ना माझ्या बोलण्यावर विश्वास ? कीं

अजूनही खोटं वाटतंय ? खोटं वाटत असेल तर तुमच्या पत्नीला बाहेर बोलवा. तिच्या तोंडावर सांगेन मी. बोलवा, मारा हांक !

**सखाराम :** मला सत्य समजलंच पाहिजे. या गोष्टीचा सोक्षमोक्ष केलाच पाहिजे. ( हांक मारतो ) लक्ष्मी, लक्ष्मी ! बाहेर ये आधीं ! लक्ष्मी, ( लक्ष्मी येते. विश्रामला पाहून रागानं )

**लक्ष्मी :** काय ?

**सखाराम :** हे काय म्हणताहेत ?

**लक्ष्मी :** काय म्हणतोय हा ?

**विश्राम :** ( शांतपणें हंसत ) कांहीं नाहीं. तें आपलं—आपण एकमेकांवर प्रेम केलं होतं, एकत्र चोरून फोटो काढले होते, प्रेमपत्रं पाठवलीं होतीं, तीं दाखवतोंय तुझ्या पतिराजांना ! त्यांत एवढं विशेष काय आहे ?

**सखाराम :** लक्ष्मी, खरं आहे हें ? तुम्ही एकमेकांना पत्रं पाठवलीं होतीं ? एकत्र फोटो काढले होते ? आईच्या शपथेवर खरं सांग !

**लक्ष्मी :** हो ! आम्ही एकमेकांना पत्रं पाठविलीं होतीं. फोटोहि काढले होते. एकेकाळीं आमचं एकमेकांवर प्रेमहि होतं.

**सखाराम :** मग हें लग्नाअगोदर कुणाला कां सांगितलं नाहींस ? मला जरी येऊन सांगितलं असतंस...

**लक्ष्मी :** डोळ्यासमोर भुकेनें तडफडून मेलल्या माणसाच्या मुडद्याला, 'तुला पक्वान्न पाहिजे होतं तर मला अगोदर येऊन कां सांगितलं नाहींस ?' असं विचारण्याइतका निर्दय प्रश्न आहे हा तुमचा ! तुम्ही तुमचं वय लक्षांत घेऊन ही चौकशी करायला पाहिजे होती. पण लग्नाचा कैफ तुम्हाला इतका चढला होता कीं आपण ज्या मुलीशीं लग्न करणार आहोंत त्या मुलीचं मन समजून घेण्याची साधी माणुसकीही तुम्ही दाखविली नाहीं.

**विश्राम :** आणि तिला मागणी घालून तिच्याशीं लग्न करून मोकळे झालांत. बाकी लग्न म्हणजे, दोघांच्याहि मागच्या आणि पुढच्या बदफैली कृत्यावर पडणारा फाटका पडदाच असतो म्हणा !

**सखाराम :** कुणाला उद्देशून म्हणता आहांत हें ?

**विश्राम :** तुम्हाला नाहीं हो, हिला उद्देशून म्हणतोंय !

**सखाराम :** म्हणजे ?

**विश्राम :** काय बावळ्टासारखे प्रश्न विचारता आहांत ! ता म्हणजे ताक–भात समजत नाहीं तुम्हाला ? अगदीं संत सखाराम आहांत झालं ! अहो, नुसते फोटो आणि प्रेमपत्र लिहीत बसलों नव्हतों एकमेकांना ! आतां तरी समजलां ना माझ्या बोलण्याचा अर्थ ? कीं आणखी याहिपेक्षां उघड्या भाषेंत बोलूं ?

**सखाराम :** नका–यापुढें एक शब्दसुद्धां बोलूं नका ! लक्ष्मी, तूं माझ्याशीं संसारांत समरस झाली नाहींस. माझा तूं नेहमीं तिरस्कार करीत आलीस. या दुःखाच्या जाणिवेंतही तुझ्या पवित्र आचरणाचा मला नेहमीं मोठा अभिमान वाटत असे. माझी लक्ष्मी माझ्याशीं कशीही वागली तरी ती पवित्र आहे. या घरची देवता–साक्षात् लक्ष्मी आहे असं मला वाटे. दुःखांतही मी समाधान मानीत असें. पण आज माझा तो भ्रम दूर झाला. आतांपर्यंत मी असत्यालाच सत्य समजत आलों. कलंकालाच पवित्र मानीत आलों.

**लक्ष्मी :** बंद करा ही पावित्र्याची बडबड ! तुम्ही तरी कुठं पवित्र आहांत ?

**सखाराम :** माझ्या दृष्टीनं तरी मी अजून पवित्र आहें.

**लक्ष्मी :** पण माझ्या दृष्टीनं तुम्ही माझ्याइतकेच कलंकित आहांत.

**सखाराम :** कसा ? कोणतं एवढं वाईट कृत्य घडलंय माझ्या हातून मला अपवित्र म्हणायला ?

**लक्ष्मी :** तुमचं पहिलं लग्न झालं होतं ?

**सखाराम :** देवा–ब्राह्मणांच्या साक्षीनें तें लग्न झालं होतं.

**लक्ष्मी :** नंतर माझ्याशीं दुसरेपणाचं लग्न केलंत.

**सखाराम :** तेंहि देवा-ब्राह्मणांच्या साक्षीनंच आपलं लग्न झालं.

**लक्ष्मी :** मी मेल्यावर देवा–ब्राह्मणांच्या साक्षीनं तिसरं लग्न कराल तुम्ही !

**सखाराम :** असं कांहीं अभद्र बोलूं नकोस लक्ष्मी !

**लक्ष्मी :** नंतर चौथं–पांचवं ! देवा–ब्राह्मणांच्या साक्षीनं जसजशीं जास्त लग्न करीत जाल, तसतसं तुमचं पावित्र्य आणखी आणखी वाढत जाणार आहे नाहीं ? देवा–ब्राह्मणांच्या साक्षीनं लग्न केलं म्हणे ! लग्न नाहीं, देवा–ब्राह्मणांच्या साक्षीनं खून केलात माझा तुम्हीं ! लग्नाचा गळफास माझ्या गळ्याला बांधून तें प्रेत तुमची आसुरी भूक भागविण्यासाठीं या घरांत फरफटत घेऊन आलांत.

**सखाराम :** नाहीं–नाहीं लक्ष्मी, मी इतका दुष्ट नाहीं.

**लक्ष्मी :** तुम्ही दुष्ट नाहीं ? एवढे पवित्र होतां, तुमच्या शीलाची तुम्हांला एवढी चाड होती, तर पहिली बायको मेल्यावर माझ्याशीं दुसरं लग्न कां केलंत ? लग्नाअगोदर मी माझ्या प्रेमाचं दान एका पुरुषाच्या पायीं वाहिलं त्यावेळीं तिथं मंत्र–मंगलाष्टकांची ओरड करून जगाला सांगायला कुणी नव्हतं, म्हणून तुम्ही मला अपवित्र म्हणतां. पण बायको मेल्यावर पुन्हा लोकांना जमवून, दाक्षिणेसाठीं मंगलाष्टकांची घसा फोडून ओरड करणाऱ्यांकडून लग्न केलंत म्हणून तुम्ही पवित्र कसे ठरतां ? तुम्ही माझ्या आयुष्यांतले दुसरे पुरुष होतां, तर मीसुद्धां तुमच्या आयुष्यांतली दुसरी स्त्री होतें. पवित्र-मंगल म्हणायचं असेल, तर आपण दोघंहि पवित्र-मंगल आहोंत आणि अपवित्र–बदफैली ठरवायचं असेल तर आपण दोघंही अपवित्र-बदफैली आहोंत–गुन्हेगार आहोंत. पण पुरुषांनीं निर्माण केलेल्या असुरीशास्त्राच्या शस्त्रानं, तुम्ही पुरुष स्त्रीइतकेच गुन्हेगार असतां, पवित्र पातिव्रत्याच्या खोट्या कल्पना आम्हां स्त्रियांच्या माथीं मारून तुम्हीं आम्हांला शिक्षा करतां–छळतां–जीव घेतां आमचा. त्या जुलमाला कंटाळून एखादी स्त्री नवऱ्याच्या घराबाहेर पडली, तर बाहेरचा समाज तिच्या चारित्र्यावर गिधाडासारखा तुटून पडायला टपलेला असतो. माझ्या प्रेमाचा विश्वासघात करणारा हा माणूस आणि आपलं वय लक्षांत न घेतां माझ्याशीं मनाविरुद्ध लग्न करणारे तुम्ही दोघेही सारखेच निर्दय आहांत, बदफैली आहांत व गुन्हेगार आहांत. माणुसकींतून उठलेल्या तुमच्यासारख्या नादान पुरुषांचं या जन्मांत कधीं तोंड पाहूं नये असं मला वाटतं ! ( झटकन् घरांत जाते )

**सखाराम :** खरं आहे.

**विश्राम :** काय खरं आहे ?

**सखाराम :** लक्ष्मी म्हणाली तें खरं आहे. माणुसकीच्या दृष्टीनं पवित्र बदफैली म्हणायचं असेल तर आम्ही दोघंहि पवित्र आहोंत, नाहींतर आम्ही दोघंहि बदफैली आहोंत—गुन्हेगार आहोंत.

**विश्राम :** आतां मात्र तुमच्या निर्लज्जपणाचा अगदीं कळस झाला. माझ्या बदफैली बायकोनं परक्या पुरुषासमोर माझी अशी निर्भत्सना केली असती, तर रक्तबंबाळ होईपर्यंत तिच्या पाठीवर फटके मारून, विषारी शब्द बोलणारी तिची जीभ हासडून बाहेर काढली असती; पण रक्ताला चटावलेल्या जनावरासारखे तुम्ही तिला दैहिक सुखाला हपापून, तिच्या पापावर पांघरूण टाकण्याचा आटोकाट प्रयत्न करतांना तिचा नवरा म्हणून जगांत मिरवायला तुम्हांला लाज वाटायला पाहिजे. कशाला तिच्याशीं लग्न केलंत ? नुसता नांवाचा नवरा म्हणून मिरवायला ?

**सखाराम :** थांबा, थांबा विश्राम ! मला एकदम फांसावर चढवण्या-अगोदर, या गुन्हेगार सखारामाचे दोन शब्द ऐकून घ्या आणि नंतर मला खुशाल फांसावर चढवा.

**विश्राम :** तुमचं आयुष्य इतक्या रडकथांनीं भरलंय, कीं त्यांतलीच मला एक रडकथा सांगून आपल्या दुबळेपणाचं समर्थन करणार दुसरं काय ?

**सखाराम :** समर्थन करणार नाहीं. एक रडकथा—माझ्या हृदयाची कथा सांगणार आहें तुम्हांला. मी लक्ष्मीशीं कां आणि कोणत्या परिस्थितींत लग्न केलं तें ऐका आणि मला काय वाटेल तें म्हणा ! ( आईच्या फोटोकडे बोट दाखवून ) ही माझी आई ! हिचा मी एकुलता एक लाडका मुलगा. माझ्या आई—वडिलांनीं आपल्या परीनं माझे खूप लाड केले. लहानपणीं माझ्या द्वाडपणानं रागावून, माझ्या आई—वडिलांनीं मला कधीं पांच बोटांनीं सुद्धां मारलं नाहीं. इतकं माझ्यावर त्यांचं प्रेम होतं. दुःखांतही त्यांनीं मला सुखी ठेवण्याचा आटोकाट प्रयत्न केला. माझं बालपण अगदीं गरिबींत गेलं. त्या परिस्थितींत माझा मित्र विश्वनाथ यानं मला खूप मदत केली. म्हणूनच माझं थोडं तरी शिक्षण झालं. वयाच्या तेवीस चौवीसाव्या वर्षी अप्पा सावकाराच्या

पेढीवर मी कारकून म्हणून राहिलों आणि त्याच वर्षी आमच्या वाड्यांतली मुलगी ‘ सीता ’ आणि मी एकमेकांवर प्रेम करूं लागलों. आमच्या प्रेमाची चाहूल सीतेच्या आणि माझ्या आई–वडिलांच्या कानीं गेली. किती प्रेमानं त्यांनीं आमचं कौतुक केलं. कसलेहि आढेवेढे न घेतां आम्हां दोघांचं त्यांनीं लग्न लावलं. विश्राम, आम्ही दोघं संसारांत इतके समरस झालों होतों कीं, आमच्या लग्नानंतरचं तें एक वर्ष फुलपांखरासारखं कधीं उडून गेलं, तें आमचं आम्हांला समजलं सुद्धां नाहीं. नंतर थोड्याच दिवसांत सीता आजारी पडली. दिवसेंदिवस तिचा आजार वाढत चालला. औषध–पाणी करूनहि गुण येईना. सारखी ती क्षीण होत चालली होती. माझ्या हृदयाचा ठाव सुटला. पावसाळ्याच्या दिवसांतली ती भेसूर रात्र. सीता आजाराच्या वेदनांनीं घरांत विव्हळत होती. बाहेर सोसाट्याचा वारा सुटला होता. विजांचा कडकडाट होऊन मुसळधार पाऊस पडत होता. जणूं कांहीं सीतेच्या दुःखानं वेडापिसा होऊन, मेघ आकाशाच्या फत्तरावर डोकं आपटून आक्रंदून ढळढळां रडत होता कीं काय कुणास ठाऊक ! आणि त्याच पहांटे सीता जास्त विव्हळूं लागली. तिनं मला अगदीं जवळ बोलावलं. डोळ्यांत प्राण आणून तिनं मला एकदां पाहून घेतलं. आणि अस्पष्ट आवाजांत म्हणाली, “ माझी आतां आशा करूं नका. मी गेल्यावर दुसरीशीं लग्न करून सुखानं संसार करा. पण मला विसरूं नका. दिवसांतून एकदां तरी माझी आठवण करा–फक्त एकदांच हो ! ” असं म्हणून तिनं डोळे मिटले ते या दुर्दैवी सखारामला पहायला पुन्हां उघडले नाहींत. विश्राम, सुखाच्या शिखरावरून क्षणांत मी दुःखाच्या दरींत कोसळलों. माझ्यांतला उत्साह–आनंद–आशा साऱ्या कांहीं भावना सीतेबरोबर निघून गेल्या. मेल्या मनाचा जिवंत माणूस म्हणून मी जगांत वावरूं लागलों. मला वेड लागलं नाहीं हेंच आश्चर्य ! आत्महत्त्येचे विचार माझ्या डोक्यांत थैमान घालीत होते. त्या असह्य दुःखांतून सुटण्याचा तो एकच मार्ग होता. पण मी आत्महत्त्या केली असती, तर माझ्या आई–वडिलांनीं माझ्या नांवानं ऊर बडवून प्राण सोडला असता, म्हणून मी जिवंत राहिलों. पुढं दोन वर्षांनीं माझे वडील मला सोडून गेले. माझ्यावर झालेला तो दुःखाचा दुसरा आघात ! आई आणि मी दोघंच या घरांत

राहिलों. तिच्या आशेचा दिवा मी होतों, तर कुठल्याहि संकटांत मला धीर देणारी माझी आई माझं सर्वस्व होती. नंतर दोन–तीन वर्षांनीं आईनं माझ्या लग्नाची गोष्ट काढली तेव्हां मी आईला म्हणालों, " आई, तुझी वाटेल ती सेवा मी करीन. तुला कांहीं कमी पडूं देणार नाहीं. हा सखाराम असेपर्यंत तुला कसल्याहि संकटाची जाणीव होऊं देणार नाहीं. पण मला पुन्हां लग्न करायला सांगूं नकोस." ज्या ज्या वेळीं आई माझ्या लग्नाची गोष्ट काढायची, त्या त्या वेळीं मी तिला असं सांगायचा. तेव्हां ती म्हणायची, " मर्जी तुझी ! " पंधरा वर्षे आईला मी असंच सांगत होतों. काळ झपाट्यानं जात होता. मला चाळीस वर्षे होऊन गेलीं. माझी आई म्हातारपणामुळं दिवसेंदिवस अशक्त होत होती. आपल्या असहाय्यतेची तिला जाणीव होऊं लागली. एके दिवशीं मला जवळ बोलावून माझ्या पाठीवरून प्रेमानं हात फिरवीत ती मला म्हणाली, "सखाराम, मी कांहीं आतां जास्त दिवस जगणार नाहीं. मी गेल्यावर तूं एकटा कसा राहाणार ? कुठं बाहेर गेलास तर सांजच्या वेळेला घरांत दिवासुद्धां लागणार नाहीं. कधीं जिवाला बरं नसलं, आजारी पडलास तर कोण पाहाणार माझ्या सखारामाला ? तूं कामावर गेलास, कीं मी घरीं याच विचारानं सारखी रडत राहातें रे ! सखाराम, मला कांहीं देऊं नकोस. कसलीहि आशा आतां माझी राहिली नाहीं. फक्त एकच आशा आहे. सखाराम, तूं लग्न कर. तुझ्यासाठीं नको–माझ्यासाठीं ! या तुझ्या वेड्या आईच्या समाधानासाठीं तरी लग्न कर. तूं लग्न केलं नाहींस, तर मरतांना माझा जीव कांहीं सुखानं जायचा नाहीं. " सांगा विश्राम, माझ्या जागीं तुम्ही असतां आणि तुमच्या प्रेमळ आईनं कळवळून तुम्हांला असं सांगितलं असतं तर तुम्ही निर्दयतेनं तिच्या शब्दाला नकार दिला असतां का ! बोला ! ( काय उत्तर द्यावं यानं भांबावून विश्राम अस्वस्थ होतो. ) माझ्यासाठीं नाहीं हो ! ( आईच्या फोटोकडे बोट दाखवून ) माझ्या आईच्या–या भोळ्या जिवाच्या समाधानासाठीं मी संमति दिली. आईला अस्मान ठेंगणं वाटलं. आनंदानं गुदमरून माझ्याकडे पाहून वेड्या-सारखी हंसली. आईला मी सांगितलं, " तूंच मुलगी पसंत कर. माझं कांहीं म्हणणं नाहीं. मात्र मुलीच्या आई–वडिलांना घरच्या मंडळींना सारी परिस्थिति समजावून सांग ! " आईनं लक्ष्मीला पसंत केली आणि एके दिवशीं

आमचं लग्न झालं. पण—नंतर लक्ष्मीच्या वागण्यावरून मला समजलं, लक्ष्मीच्या मनाविरुद्ध हें लग्न झालं. लक्ष्मी मनानं माझा अत्यंत तिरस्कार करते. विश्राम, संसाराचं स्वप्न भंग पावलेल्या त्या दुःखी जिवाला, धर्मानं माझी पत्नी असलेल्या लक्ष्मीला आतांपर्यंत मी साधा स्पर्शसुद्धां केला नाहीं. ( विश्राम धक्का बसल्याप्रमाणं चमत्कारिकपणें सखारामकडे पहातो. ) जगाच्या दृष्टीनं नवरा—बायको म्हणून आम्ही एकत्र आहोंत, पण देहानं आणि मनानं दोन ध्रुवांइतके एकमेकांपासून दूरदूर आहोंत. माझा इतका तिरस्कार करूनहि लक्ष्मी या घरांत राहते हा तिच्या मनाच्या केवढा मोठेपणा ! आमचं लग्न झाल्यावर आई कांहीं जास्त दिवस राहिली नाहीं. सहा महिन्यांच्या आंतच ती मला सोडून गेली आणि हा सखाराम घरदार असून—पत्नी असून जगांत पोरका झाला. माझ्या हृदयाची कथा—नाहीं रडकथा सांगून संपली. विश्राम, आतां माझी नेभळट, दुबळा, भेकड म्हणून हेटाळणी केलीत तरी मला त्याचं कांहीं वाटणार नाहीं.

**विश्राम** : ( गहिंवरून ) क्षमा करा, क्षमा करा. मला हें माहीत नव्हतं. थांबा. ( मोठ्यानं हांक मारतो ) लक्ष्मी ! लक्ष्मी ! !

**सखाराम** : कशाला हांका मारतां तिला ?

**विश्राम** : तुमच्याशीं सुखानं संसार करण्यास सांगणार आहें मी तिला. वय व सौंदर्य यापेक्षां माणसाचे सद्‌गुण श्रेष्ठ असतात.

**सखाराम** : कांहीं सांगूं नका तिला. हृदयाच्या खोल जखमा दुसऱ्याच्या दोन शब्दांनीं कधींहि बऱ्या व्हायच्या नाहींत. विश्राम, जा तुम्ही ! ( विश्राम जात असतां समोरून बाबा येतो. विश्रामला पाहून रागानं ).

**बाबा** : पुन्हां तूं इथं कां आलास ? बोल—पुन्हां इथं तूं कां आलास ?

**विश्राम** : ( रुक्षपणें हंसून ) कां आलों ! बाबासाहेब, विषारी फुत्कार टाकीत कडकडून दंश करणाऱ्या सर्पाच्या त्वेशानं मी इथं आलों होतों. दुःखी संसारांत संशयाची ठिणगी टाकून, तो जळता संसार पाहून राक्षसी वृत्तीनं खदखदां हंसायला आलों होतों. पण मी किती क्षुद्र होतों तें आज मला

समजलं. बाबासाहेब, तुमच्या–लक्ष्मीच्या–यांच्या कुणाच्याहि आयुष्यांत यापुढं मी कधींच येणार नाहीं. सुखानं संसार करा तुम्ही. ( झटकन् जातो. )

**बाबा** : ( आश्चर्यानं ) इतका कसा बदलला तो ! तुमच्या सांगण्यानं कीं लक्ष्मीच्या सांगण्यानं ? त्याचं मन बदलायला लक्ष्मी तुमच्याशीं चांगलेपणानं वागली का ?

**सखाराम** : हो ! तशी ती फार चांगली आहे.

**बाबा** : वाटलंच होतं मला. आज ना उद्यां लक्ष्मी तुमच्याशीं सुखानं संसार करील. माझी अब्रू जाऊं देणार नाहीं. कुठंय ती ?

**सखाराम** : घरांत आहे.

**बाबा** : थांबा, तिला घेऊन येतों. तुम्ही दोघं जणं हंसून एकमेकांशीं बोलतांना मला पहायचंय. तसं आतांपर्यंत मी पाहिलेलं नाहीं. थांबा, तिला बाहेर घेऊन येतों. ( भारावलेल्या आवाजांत ) ( लक्ष्मी, लक्ष्मी, अशा हांका मारीत घरांत जातो. सखाराम आईच्या फोटोकडे पहातो. )

**सखाराम** : आई ! पाहिलास या तुझ्या लाडक्या सखारामाचा संसार !

[ पडदा पडतो ]



# ३

[ सखारामच्या घरांतील बैठकीची जागा. भिंतीला लावलेलीं कॅलेंडर्स बदललेलीं आहेत. बाकी सजावट पहिल्या प्रमाणेंच. बाबा बाहेरून घाईघाईनं लक्ष्मीला हांका मारीत आंत येतो. ]

**बाबा** : लक्ष्मी, लक्ष्मी !

**लक्ष्मी** : काय ? एवढे घाबरलांत कशाला तुम्ही ?

**बाबा** : सखाराम कुठें आहेत ?

**लक्ष्मी** : कामावर गेले आहेत ते सकाळीं !

**बाबा** : त्यानंतर इथं आले नाहींत ?

**लक्ष्मी** : नाहींत !

**बाबा** : येणार नाहीं असं सांगितलंय का ?

**लक्ष्मी** : कांहीं सांगितलं नाहीं.

**बाबा** : ( आश्चर्यानं ) कांहीं सांगितलं नाहीं ?

**लक्ष्मी** : एवढं काय झालंय ?

**बाबा** : कांहीं नाहीं. ( थोडा विचार करून ) लक्ष्मी, तुला या दीड–दोन वर्षांत सखारामनं दागिने वगैरे घेतलेत का ?

**लक्ष्मी** : ( तिरस्कारानें ) काय म्हणालांत ?

**बाबा** : दागिने, कपडालत्ता !

**लक्ष्मी** : ( उपहासानें ) दागिने, कपडालत्ता ! अहो, त्यांच्यासारख्या एवढ्या मोठ्या लाखमोलाच्या सोज्वळ दागिन्याच्या गळयांत तुम्ही मला बांधली असतांना, ते मला सोन्यामोत्यांचे भिकारडे दागिने कशाला करतील ? आणि वेश्यासारखी मी तरी कशाला मागेन ?

**बाबा :** तुझ्यासाठीं कांहींच घेतलं नाहीं त्यांनीं ?

**लक्ष्मी :** लग्न झाल्यापासून एक फुटका मणीसुद्धां घेतला नाहीं मला त्यांनीं ! कपडालत्ता म्हणाल, तर लग्नांतलीं हीं लुगडीं वापरतें मी ! अहो, तेच जिथं फाटक्या धोतरांना ठिगळं लावीत बसतात, तिथं माझ्यासाठीं काय दागिने आणि कपडालत्ता घेणार ?

**बाबा :** म्हणजे स्वतःसाठीं सुद्धां सखारामनं कपडालत्ता घेतलेला नाहीं ?

**लक्ष्मी :** मला कांहीं माहीत नाहीं. मी नाहीं त्याना कधीं विचारीत. आतां एखाद्या बाहेरच्या बयेचं घर भरीत असतील आणि इथं भिकाऱ्याचं नाटक करीत असतील तर...

**बाबा :** लक्ष्मी ! सखाराम असल्या मार्गानं कधींहि जाणार नाहींत. त्यांचा शत्रूसुद्धां असले आरोप त्यांच्यावर कधींहि करणार नाहीं.

**लक्ष्मी :** मग तुम्ही घाबरून जाण्यासारखं तुमच्या जांवयानं केलं तरी काय ?

**बाबा :** तसं कांहीं नाहीं, पण काय ग, कुणाला कर्जाऊ वगैरे पैसे दिलेत का ?

**लक्ष्मी :** हें तुम्ही मला कशाला विचारताहांत ? तुम्हीं तुमच्या गुणी जांवयांना विचाराना !

**बाबा :** कामावरून आल्यानंतर, मित्रांबरोबर कधीं रात्रीं अपरात्रीं बाहेर जातात का सखाराम ?

**लक्ष्मी :** कुठंहि जात नाहींत. मात्र दीड–दोन वर्षांत बऱ्याच वेळीं रात्रीं बसून कांहीं तरी लिहीत असतात. तुकारामबुवासारखे अभंग लिहीत असतात कीं काय कुणास ठाऊक !

**बाबा :** त्या देवमाणसाला असं हेटाळणीनं बोलूं नकोस लक्ष्मी ! कसा झाला तरी तो तुझा नवरा आहे. ( थोडं थांबून ) काय ग, तुझ्याजवळ पगार वेळेवर आणून देतात ना सखाराम ?

**लक्ष्मी :** हो ना ! मला दिसेल असा समोरच माजघरांतल्या फळीवर ठेवतात. तो मिठा–पिठालाच संपून जातो. आणि मी माझ्या एकवचनी—एकपत्नी रामासारख्या नवऱ्याच्या संसारांत अगदीं ऐषअरामांत लोळत राहतें. कांहीं काळजी करूं नका तुम्हीं आमची. मरेपर्यंत असेच आनंदांत राहूं आम्ही !

**बाबा :** आनंदांत ! वेडे आनंदांत नाहीं !

**लक्ष्मी :** म्हणजे ?

**बाबा :** कसं सांगूं तुला !

**लक्ष्मी :** आपल्या सासऱ्याची अब्रू जाईल असं तुमच्या देवमाणसानं कांहीं केलंय का ? तसं असेल तर मला कांहीं सांगूं नका ! त्यांनाच जाऊन उपदेश करा तो !

**बाबा :** अजूनहि हेटाळणीनं बोलते आहेस तूं ! खरी गोष्ट समजली तर इथं डोकं आपटून घेशील, धायधाय रडशील !

**लक्ष्मी :** काय केलंय एवढं त्यांनीं ? कुणाची चोरी तर केली नाहीं ना ?

**बाबा :** चोरी नाहीं, पण—

**लक्ष्मी :** आणखी काय केलंय दुसरं ?

**बाबा :** ते मला भेटायला पाहिजे होते. पहिल्यानं त्यांना विचारणार. काय समजावं तेंच समजत नाहीं. कीं यावेळीं त्यांना—( बाहेर गाणं गुणगुणल्याचा आवाज ) सखाराम आले वाटतं !

**लक्ष्मी :** तुम्ही रडकुंडीला आला आहांत, तर ते अगदीं खुशींत गात येताहेत. ( सखाराम " संशय कां मनीं आला " हे गाण्याचे चरण गुणगुणत हंसत येतो. लक्ष्मी व बाबा आश्चर्यानं त्याच्याकडे पहातात. )

**बाबा :** आलांत तुम्ही !

**सखाराम :** तुम्ही आहांत का ? छान ! ( टोपी–कोट काढून ठेवतो. )

**बाबा :** ( त्याचं निरीक्षण करीत ) कुठं गेलां होता ?

**सखाराम** : ( आराम खुर्चीवर बसतां–बसतां ) फिरायला गेलों होतों. बसा ना तुम्ही ! लक्ष्मी चहा कर थोडा ! ( लक्ष्मी अधिक आश्चर्यानं पहाते. )

**बाबा** : ( खुर्चीवर बसतो. ) फिरायला गेलां होतां ?

**सखाराम** : खोटं नाहीं सांगत, खरोखरच फिरायला गेलों होतों. अप्पा सावकाराच्या पेढीवरून दुपारींच निघून, डोंगराच्या माथ्यावर जाऊन खूप खूप फिरलों. वाटेंतल्या आंब्या–काजूच्या झाडावरसुद्धां दगड मारले मी. ( हंसतो )

**बाबा** : ( भीतियुक्त आश्चर्यानं ) सखाराम तुम्ही आणि...

**सखाराम** : हो हो मी दगड मारले. कां कुणास ठाऊक, आज मला माझ्या बालपणाचे दिवस आठवले. त्याच द्वाड गंमतीनं–आनंदानं आज माझ्या हृदयांत प्रवेश केला होता. मोठेपणीचं तें बंदिस्त, रुक्ष आयुष्य क्षणांत भिरकावून देऊन, पोरासारखा मी डोंगरमाथ्यावरून धांवलों–मोठमोठ्यानं गाणीं म्हटलीं–हंसलों ! ( हंसतो ) डोंगराच्या माथ्यावरून अफाट पसरलेला समुद्र दिसत होता. माझा आनंद आज समुद्राला समजला असावा. मोठमोठ्या लाटांच्या हाताच्या खुणा करून तो मला आपणाजवळ बोलावूं लागला. हृदयांतून ओसंडून निघणाऱ्या आनंदाच्या बेहोषींत मी समुद्र किनारीं पोहोंचलों. गुढगाभर पाण्यांत जाऊन गंमतीनं मी समुद्राचं पाणी हातांत घेऊन, एक–दोन घोट प्यालों. त्या खाऱ्या पाण्याच्या चवीनं हंसत मी तोंड वेडंवाकडं केलं. एवढ्यांत एक लाट घोंगावत येऊन माझ्या पायाजवळ कोसळली. जणूं कांहीं ती माझ्या पोरकटपणाला खदखदून हंसली असावी ! ( हंसतो. )

**बाबा** : सखाराम काय सांगता आहांत हें ?

**सखाराम** : ( आपल्याच विचारांत ) समुद्र किनाऱ्यावरून घरीं येत असतांना ( अभावीतपणें खुर्चीवरून उठतो. ) एका म्हाताऱ्या बाईनं, धान्यानं भरलेली टोपली आपल्या डोक्यावर उचलून ठेवण्यास सांगितली. मी तिच्याकडे पहातच राहिलों. म्हातारपणामुळं ती टोपली घेऊन जाणं तिला अगदीं अशक्य होतं. क्षणाचाहि विचार न करतां ती टोपली मी माझ्या

डोक्यावर घेऊन चालूं लागलों. ती नको नको म्हणत असताना मी झपझप चालत होतों. तिच्या बोलण्यावरून समजलं, कीं ती गरिबीमुळं एवढ्या म्हातारपणांतहि मोलमजुरी करून पोट भरीत होती. धान्य पोहोंचविल्याची तिला चार आणे मजुरी मिळाली. येतांना ती म्हणाली, " बाबा, हे तुझे दोन आणे घे " ! गरिबींतला तो दिलदारपणा पाहून माझं हृदय भरून आलं. मी म्हणालों, "आईकडून का मुलानं मजुरी घ्यावयाची असते ?" केवढ्या कृतज्ञतेच्या कौतुकानं तिनं माझ्याकडे पाहिलं ! तिच्या डोळ्यांतून घळघळ अश्रु वाहूं लागले. तिच्या रूपानं माझ्या आईचं दर्शन मला घडलं. झटकन् तिनं आपल्या नातवासाठीं पदरांत बांधून आणलेले मूठभर चणे देत मला म्हणाली, " हे तरी घे, नको म्हणूं नकोस ! " भारावलेल्या मनानं माझ्या आईचा तो मंगल प्रसाद घेऊन मी निघालों. वाटेंत लहान-लहान मुलं खेळत होतीं. त्यांतल्या बाजूला उभ्या असलेल्या मुलाचं माझ्याकडे लक्ष गेलं. तो मुलगा माझ्याकडे टकमका पाहूं लागला. धांवत जाऊन माझ्या हातांतले मी त्याला चणे दिले. त्याबरोबर बाकीचीं मुलें माझ्याकडे पाहूं लागलीं. तसाच बाजूच्या दुकानांत जाऊन, माझ्या खिशांत होते नव्हते तेवढ्या पैशांचा खाऊ घेऊन मी त्यांना वाटूं लागलों, तेव्हां " मामा मला, मामा मला ! " म्हणून त्या चिमण्या पांखरांनीं एकच किलबिलाट केला. तिथून निघतांना, " मामा उद्यां या हं !" म्हणून पुन्हां तीं चिमणी पांखरं किलबिललीं ! त्या निष्पाप जिवांचा निरोप घेतांना मला वाटलं, यांच्यासारखाच मी लहान असतों तर किती छान झालं असतं ! माणसाचं मन किती विचित्र असतं. लहान असतांना त्याला कधीं मोठा होईन याची चिंता पडलेली असते, तर मोठेपणीं मी लहान असतों तर किती छान झालं असतं असले विचित्र विचार त्याच्या मनांत उठत असतात. खरं म्हणजे माणूस कितीहि मोठा झाला तरी त्याचं मन लहानच राहतं ! ( रुक्षपणें हंसतो. )

**बाबा :** असे काय बोलता आहांत आणि हंसता आहांत तुम्ही ?

**सखाराम :** बाबासाहेब, खुल्या मनानं माणसानं आपल्या मनांतला आनंदसुद्धां व्यक्त करूं नये कीं काय ?

**बाबा :** पण असे कधीं तुम्ही बोलत नव्हतां, हंसत नव्हतां पण आज—

**सखाराम :** सांगितलं नाहीं का तुम्हांला मी, आज मला खूप खूप आनंद झालाय म्हणून ! सारखं बोलत राहावं, हंसत राहावं, पोरासारखं वागडावं, खेळावं, गावं, हंसावं ! बाबासाहेब, माझ्या आयुष्यांत इतका आनंद मला कधींच झाला नव्हता.

**बाबा :** बोलताहांत ते–तुम्हीं शुद्धींत बोलताहांत ना ?

**सखाराम :** ( हंसत ) चांगला शुद्धींत आहे मी. ही लक्ष्मी आहे. तिचे तुम्ही वडील आहांत. तुम्ही माझे सासरे आहांत. बरोबर बोलतोंय ना मी ? कीं कांहीं चुकलों ?

**बाबा :** ( भारावलेल्या आवाजांत ) बोलायला चुकलां नाहींत. पण...

**सखाराम :** काय ?

**बाबा :** आयुष्यांत मात्र मोठी चूक केलीत तुम्ही !

**सखाराम :** ( एकदम गंभीर होऊन ) हो ! जाणीव आहे मला त्याची. कधींहि न सुधारतां येणारी चूक केलीय मी. तुमच्या लक्ष्मीशीं मनाविरुद्ध लग्न केलं हीच ना मी माझ्या आयुष्यांत मोठी चूक केली ?

**बाबा :** नाहीं हो ! त्याबद्दल नाहीं बोलत मी !

**सखाराम :** तर कशाबद्दल बोलताहांत ?

**बाबा :** तुम्हांला माहीत नाहीं ?

**सखाराम :** काय ?

**बाबा :** आप्पा सावकाराच्या पेढीवर गेलां होतां तुम्ही ?

**सखाराम :** हो, गेलों होतों.

**बाबा :** मग तुम्हांला समजलं नाहीं ? आप्पा सावकाराच्या पेढीवरील पैशांची अफरातफर !

**सखाराम** : ( शांतपणें ) मीच केली ती ! ( लक्ष्मी दिङ्मूढ होऊन सखारामाकडे पहात राहते. )

**बाबा** : तुम्हीच ? अहो सखाराम, काय करून बसलांत तुम्ही हें ?

**सखाराम** : मीच सकाळीं आप्पा सावकारांना चिठ्ठी लिहिली. गेल्या वर्ष–दीड वर्षापासून मी तुमच्या पैशांची अफरातफर करीत आहें. पहिल्या वर्षी खोटे हिशोब दाखवून तुम्हांला फसवलं ! फसवलं कसलं ? माझ्यावरील तुमच्या विश्वासाचा फायदा घेतला. या वर्षी तुम्हांला फसवणं अशक्य आहे. जवळजवळ दोन हजार रुपये मी पेटीवरून खर्च केलेले आहेत. त्याबद्दल तुम्ही द्याल ती शिक्षा मी आनंदानं भोगायला तयार आहें.

**बाबा** : अहो, पण एवढे पैसे तुम्ही कुणासाठीं खर्च केलेत ?

**सखाराम** : माणसांनीं करण्यासारखीं जगांत इतकीं व्यसनं आहेत, त्यांतल्या एका व्यसनापायीं मी ते पैसे खर्च केले असं समजा !

**बाबा** : तुम्ही आणि एखाद्या व्यसनापायीं पैसे उडविलेत हें कुणाला खरं तरी वाटेल का ? अहो, तशाच एखाद्या कामासाठीं तुम्हांला एवढे पैसे पाहिजे होते, तर सावकाराकडून कर्जाऊ घ्यायचे होतेत.

**सखाराम** : पहिल्यानं मी तसेच पैसे काढले. नंतर कर्जाऊ पैसे मागायला माझ्याजवळ कांहींच साधन उरलं नाहीं. आणि पुढं नुसते कर्जाऊ पैसे मागण्याची मला लाचारी करतां आली नाहीं.

**बाबा** : पहिल्यानं कशावर पैसे काढलेत ?

**सखाराम** : या माझ्या मोडक्या–तोडक्या घरावर !

**बाबा** : घरावर ? म्हणजे हा तुमचा संसार तुम्ही तुमच्या हातानं गहाण टाकलांत सखाराम ? अहो, या घरांत तुमची बायको राहाते, तुम्हांला अजून संसार करायचाय याचा सुद्धां कसा विसर पडला हो ! एका शब्दानं तरी सांगायचं होतं मला तुम्ही !

**सखाराम** : गोष्ट होऊन गेली आहे. त्याबद्दल दुःख करण्याचं कांहींच कारण नाहीं. कुठल्याहि शब्दांनीं मला माझ्या चुकीचं समर्थन करतां येणार

नाहीं. तुम्ही कांहीं वाईट वाटून घेऊं नका. माझ्यासाठीं कुणी जामीन राहिलेलाहि मला आवडणार नाहीं. आजपर्यंत विश्वासू म्हणून समजला जाणारा सखाराम उद्यांपासून विश्वासघातकी म्हणून जगांत ओळखला जाणार आहे.

**बाबा** : पण एवढे पैसे कुणासाठीं खर्च केलेत—काय केलंत एवढ्या पैशाचं ? सांगा, कुणाला दिलेत ?

**सखाराम** : दुसऱ्या कुणाला दिले नाहींत कीं कुणासाठीं खर्च केले नाहींत. मी ते पैसे माझ्यासाठीं खर्च केले. म्हटलं जगांत इतके लोक चैन करताहेत आपणहि त्यांच्यासारखी चैन करावी, मजा करावी. ( हंसतो ) आयुष्यांत काय आहे दुसरं ? ( विश्वनाथ बाहेरून, " सखाराम, सखाराम ! " अशा हांका मारीत येतो. त्याच्या हातांत फुलं आहेत. पूर्वीपेक्षां त्याचा चेहरा तेजदार दिसतो. स्वच्छ लेंगा व सदरा ही त्याची वेषभूषा ).

**विश्वनाथ** : ( आनंदानं आंत येत ) सखाराम, सखाराम !

**सखाराम** : ( गहिंवरून हंसत ) विश्वनाथ ! ( दोघे भेटतात. एकमेकांकडे आसावलेल्या नजरेनं पहात हंसतात. बाबा व लक्ष्मीला त्यांच्या वागण्याचा कांहींच बोध होत नाहीं. )

**विश्वनाथ** : कसा दिसतों आतां ?

**सखाराम** : छान दिसतोस. दोन वर्षांपूर्वी पाहिलेला माणूस तुला आतां ओळखणार मुद्दां नाहीं.

**विश्वनाथ** : अस्सं !

**सखाराम** : हो ना !

**विश्वनाथ** : डॉक्टरहि असंच म्हणाले; तुम्हांला आतां भ्यायचं कांहींच कारण नाहीं. ( हंसत हातांतील फुलं सखारामच्या शर्टच्या खिशांत खोवतो. एका फुलाच्या पाकळ्या सखारामच्या डोक्यावर उधळतो. )

**सखाराम** : ( सखाराम फुलं टेबलावर ठेवीत, डोक्यावरील पाकळ्या झटकीत हंसत ) असं काय वेड्यासारखं करतोस !

**विश्वनाथ :** वेड्यासारखं नाहीं, आनंदानं वेडच लागलंय मला! ( खिशांतून लहान पुडी काढतो. ) हे पेढे घे !

**सखाराम :** कसले पेढे ?

**विश्वनाथ :** आधीं घे आणि खा ! मग सांगतों कसले ते ! घे ! ( सखारामला पेढे देतो. सखाराम पेढे खातो. लक्ष्मीजवळ जाऊन ) वहिनी, पेढे घ्या हे ! ( लक्ष्मी विचाराच्या संभ्रमांत दुसरीकडे पहाते. ) मान कां फिरवलीत ? ( भारावलेल्या आवाजांत. ) दोन वर्षांपूर्वी मी इथं आलों होतों त्यावेळीं माझ्यावर तुम्ही खूप रागावला होता. अजूनहि तो राग माझ्यावर आहे तुमचा ? नका हो वहिनी, रागावूं नका माझ्यावर ! जगांत कुणी नाहीं हो माझं ! तुमच्याशिवाय कुणी नाहीं. माझा सखाराम होता म्हणूनच मी या जगांत जिवंत राहिलों. माझा पुनर्जन्म झाला त्या माझ्या पुनर्जन्माचे पेढे देतोंय तुम्हांला. हात पुढं करा वहिनी, हात पुढं करा ! माझा सखाराम मला भेटला नसता...( लक्ष्मी अभावीतपणें हात पुढें करीत असतां फौजदार येतो.)

**फौजदार :** सखारामभाऊ, आहांत ना घरीं ?

**बाबा :** ( बावरून ) फौजदारसाहेब ! ( विश्वनाथहि आश्चर्यानं पाहातो. )

**सखाराम :** ( शांतपणें ) तुम्ही आलांत ?

**फौजदार :** नाईलाजानं ! पहिल्यानं त्या गोष्टीवर आमचा विश्वास सुद्धां बसेना. आज तीन–चार वर्षे आम्ही तुम्हाला पाहातों आहोंत. माणसाच्या नजरेवरून माणसाची पारख करणारे आम्ही लोक ! तुमच्याविषयीं आम्हांला तसा साधा संशय सुद्धां कधीं आला नाहीं.

**सखाराम :** मी माणूस आहें आणि माणसाची बुद्धि कधीं फिरेल तें सांगतां यायचं नाहीं. ( विश्वनाथ भेदरून सखारामकडे पहातो. )

**फौजदार :** अहो, तुम्ही पेढीवरून कुठं बाहेर गेलांत, तर अप्पा सावकार केवढ्या अभिमानानं आम्हाला सांगायचे, "आमचा सखाराम आहे म्हणून आमचा व्यापार–धंदा आहे. आतांपर्यंत एका पैशाचीहि अफरातफर केली नाहीं कधीं." असं सांगणारे अप्पा सावकार, किती चिडले होते तुमच्यावर

पोलीस ठाण्यावर कंप्लेंट द्यायला आले होते तेव्हां ! ' बेड्या ठोकून फटके मारीत घेऊन या ' आम्हांला म्हणाले !

**विश्वनाथ :** बेड्या ठोकून फटके मारीत ? या सखारामाला ?

**सखाराम :** मग वेळ कशाला ? ठोका बेड्या आणि फटके मारीत घेऊन चला मला !

**विश्वनाथ :** कशाला ? काय केलंस तूं ?

**फौजदार :** कायद्यानं तुम्हांला बेड्या घातल्या पाहिजेत ! पण तुमच्या-सारख्या सज्जन माणसाला बेड्या घालणं म्हणजे सत्यालाच बेड्या घालण्या-सारखं आहे. मी बाहेर हवालदाराबरोबर बोलत आहें, तुमचं बोलून झालं कीं या बाहेर ! ( फौजदार बाहेर जातो. )

**सखाराम :** मला कांहीं बोलायचं नाहीं. मी येतों तुमच्याबरोबर ! ( बाहेर जाऊं लागतो. विश्वनाथ त्याला अडवतो. )

**विश्वनाथ :** मला बोलायचंय तुझ्याशीं ! सांग काय केलंस ? कुणाची अफरातफर केलीस ? कशासाठीं ? किती पैशांची ? सांग लवकर सांग ! नाहीं तर दुःखानं जीव गुदमरून जाईल माझा !

**सखाराम :** विश्वनाथ, झाल्यागेल्या गोष्टीबद्दल बोलण्यांत आतां कांहीं अर्थ नाहीं. मी गुन्हा केला आहे आणि गुन्हेगाराला शिक्षा ही झालीच पाहिजे.

**विश्वनाथ :** पण कुणासाठीं गुन्हा केलास ? किती पैशांची अफरा-तफर केलीस ?

**सखाराम :** मी माझ्यासाठीं गुन्हा केला. माझ्यासाठीं पैशांची अफरातफर केली. जवळजवळ दोन हजारांची मी अफरातफर केली. अप्पा सावकाराच्या पेढीवर राहिल्यापासून मी ती चोरी करीत होतों. पण चोरी नेहमींच कशी पचेल ? इतक्या वर्षांनीं आज उघडकीस आली ती !

**विश्वनाथ :** खोटं बोलतोस, खोटं बोलतोस तूं सखाराम ! उगाच दूषणं लावून स्वतःचं समर्थन करूं पहातोस तूं !

**सखाराम :** नाहीं—नाहीं विश्वनाथ खरं बोलतोंय ! मी माझ्यासाठीं पैसे चोरले—मी माझ्यासाठीं—

**विश्वनाथ :** ( दुःखानं ओरडून ) तुझ्यासाठीं नाहीं माझ्यासाठीं ! ( भावना वेग आंवरीत ) उगाच खोटं बोलून सत्य लपत नसतं सखाराम ! तुझ्यासाठीं पैशांची अफरातफर केलीस, पैसे चोरलेस ? तुझ्या आईच्या शपथे-वर सांग पाहूं ! ( सखारामच्या हाताला धरून आईच्या फोटोकडे ओढीत नेतो. ) घे आईची शपथ आणि सांग मी स्वतःसाठीं पैसे चोरले म्हणून ! घे शपथ !

**सखाराम :** ( एकदां आईच्या फोटोकडे पाहून खालीं पहात भारावलेल्या आवाजांत ) विश्वनाथ !

**विश्वनाथ :** पुन्हां मरणाच्या यातना सहन करण्यासाठींच का मला तूं जिवंत केलंस ?

**सखाराम :** विश्वनाथ असं बोलूं नकोस. सुखानं राहा तूं !

**विश्वनाथ :** माझ्यासाठीं तूं आपल्या अब्रूचा लिलांव केलास आणि मला सुखानं जगायला सांगतोस ? अरे मरायला टेकलेलीं माझ्या देहाचीं हीं चार हाडं, कुठाल्यातरी उकिरड्यावर सडून पडलीं असतीं तर कोण रडणार होतं माझ्यासाठीं ?

**सखाराम :** ( आत्यंतिक दुःखानं ) विश्वनाथ !

**विश्वनाथ :** क्षणभर सुखाचा भास होतो न होतो तोंच तूं तुझ्या हातानं माझा कडेलोट केलास. हॉस्पिटलमध्यें असतांना, आईच्या वात्सल्यानं भरलेलीं तुझीं पत्र वाचतांना मनांत मी केवढे मनोरे बांधीत होतों. बरं होऊन गेल्यानंतर माझ्या आयुष्यांतला क्षणन् क्षण मी माझ्या सखारामच्या सुखासाठीं खर्च

करण्याचं ठरवलं होतं. पण तेंहि सुख तूं माझ्यापासून हिरावून घेतलंस. मला जीवन देणारा म्हणून तुला दयाळू म्हणूं कीं तुझ्या सुखासाठीं धडपडण्याची क्षणभरहि संधी न देणाऱ्याला तुला दुष्ट म्हणूं? काय म्हणूं तुला? वेड्या वेड लागायची वेळ आलीय माझ्यावर! कशाला मला जिवंत केलंस?

**सखाराम :** माझ्यासाठीं! माझा जीव माझ्या समोर तडफडून गेलेला मला कसा पहावला असता?

**विश्वनाथ :** स्वतःला मारून तूं मला जिवंत केलंस. तुझ्या मृत्यूच्या मोलाचं जीवन जगतांना क्षणाक्षणाला त्या दुःखाची मला जाणीव होऊन, मरणाच्या मार्गानं मी पुन्हां झपाट्यानं चालूं लागेन!

**सखाराम :** नको–नको विश्वनाथ, असले विचार सुद्धां मनांत आणूं नकोस!

**विश्वनाथ :** अरे, त्यागच करायचा होता तर स्वतःसाठीं–आपल्या माणसा-साठीं तरी करायचा होतास. कुणासाठीं कसं तरी आपलं अमोल आयुष्य मातीच्या मोलानं उधळण्यांत काय साधलंस तूं सखाराम?

**सखाराम :** विश्वनाथ, संसारांत उदास निराश झालेलं माझं मन कुणाच्या तरी प्रेमासाठीं व मायेसाठीं हपापलं होतं, ओढ लागली होती व भूक लागली होती त्या मनाला. मोकळ्या मनाचा, खुल्या दिलाचा व प्रेमाचा एकच शब्द ऐकण्या-साठीं माझा प्राण कंठाशीं आला होता. पण उपहास, तिरस्कार याशिवाय कांहीं माझ्या वांट्याला आलं नाहीं. जिवाचा तो कोंडमारा असह्य होत होता. मी कशासाठीं आणि कुणासाठीं जगत होतों तें माझं मलाच समजत नव्हतं. एवढ्यांत तूं आलास. माझ्या भुकेल्या मनानं तुझ्यावर प्रेमाचा वर्षाव केला. कोंडलेल्या भावनांचे बांध फुटून हृदय आनंदानं भरून गेलं. जिवाचं सार्थक झाल्यासारखं वाटलं. विश्वनाथ, तुझ्यासाठीं माझा जीव जरी कुणी मागितला असता तरी मी तो हंसत–हंसत घ्यायला सांगितला असता!

**विश्वनाथ :** तूं माझ्यावर प्रेमाचा वर्षाव केलास. तुझ्या मनाचं समाधान झालं—जिवाचं सार्थक झालं—सारं कांहीं झालं तुझं ! पण या घरची लक्ष्मी-माझी वहिनी तिला काय मिळालं ? ( फौजदार येतो. )

**फौजदार :** चला सखाराम, वेळ होत आहे. घरचा निरोप घेऊन बाहेर या तुम्ही !

**सखाराम :** घरचा निरोप ! कुणी नाहीं माझं घरांत ! चल विश्वनाथ ! ( फौजदार बाहेर जातो. सखाराम विश्वनाथाचा हात धरून बाहेर जाऊं लागतो.)

**लक्ष्मी :** ( असहाय्यतेच्या दुःखानं ) आहें—मी घरांत आहें—मी घरांत आहें हो !

**सखाराम :** तूं घरांत आहेस, पण माझी कोण आहेस तूं ?

**लक्ष्मी :** आतांपर्यंत मी तुमच्याशीं इतक्या निर्दयतेनं वागलें आहें, कीं मी तुमची पत्नी आहें असें सांगण्याचाहि मला अधिकार उरलेला नाहीं.

**सखाराम :** लक्ष्मी, तूं माझ्याशीं नवरा या नात्यानं वागली नाहींस त्याचं मला दुःख होत नाहीं. पण साध्या माणसासारखी सुद्धां तूं माझ्याशीं वागली नाहींस.

**लक्ष्मी :** या पुढं तशी वागेन. माझ्या जिवाची कुरवंडी करून माझ्या सौभाग्याला जपेन. या पायाची शपथ घेऊन सांगतें हो ! ( पाया पडायला जाते. सखाराम तिला अडवतो. )

**सखाराम :** नको नको ! लक्ष्मी, या दरिद्री माणसाच्या पाया पडूं नकोस. कुणी पाया पडलेलं मला आवडत नाहीं. आणि एवढं पायां पडायला मी तरी कुठं तुला सुखी केली ? माझ्याशीं लग्न झाल्यामुळं तुं दुःखी झालीस—जन्माची दुःखी झालीस. आज मी इथून जात आहें. सुखानं राहा तूं ! कदाचित् या घरांत पुन्हां मी येईन कीं नाहीं कुणास ठाऊक !

**लक्ष्मी** : नका हो नका—असं बोलूं नका ! या लक्ष्मीला वेडी—मूर्ख—दुष्ट—निर्दय म्हणून ठार मारा. पण तुम्हीं असं बोलूं नका ! आणि खरोखरच पुन्हां तुम्हांला घरीं यायचं नसेल, तर तुमच्या हातानं हें कुंकू पुसून टाका ! हें मंगळसूत्र तोडून न्या ! ( रडते )

**सखाराम** : ( गहिंवरून ) लक्ष्मी ! रडूं नकोस. आतांपर्यंत रडत आलीस, यापुढं तरी रडूं नकोस. मी बोललेलं सारं विसरून जा ! माझ्यासाठीं कांहीं करूं नकोस. फक्त एकच इच्छा आहे माझी. लक्ष्मी, इथं आल्यापासून एकदांहि तूं माझ्याशीं हंसली नाहींस. आतां तरी एकदां हांस ! त्या तुझ्या हास्यानं, जगाची हेटाळणी—उपहास—तिरस्कार—तुरुंगांतील मानसिक यातना सारं कांहीं विसरून जाईन मी ! हांस लक्ष्मी, हांस एकदां ! [ लक्ष्मी सखारामाकडे पहात हंसण्याचा प्रयत्न करते, पण नजरेला नजर भिडतांच आपण बोललेल्या मागच्या सर्व शब्दांची तिला आठवण होऊन ती एकदम रडते. ] लक्ष्मी, रडतेस तूं ! मी तुला हंसायला सांगितलं रडायला नाहीं.

**लक्ष्मी** : थांबा हंसतें मी. ही पहा हंसलें ( पुन्हां तिला रडूं येतें. )

**बाबा** : सखाराम, कुठल्या वेळेला हंसायला सांगता आहांत तिला ?

**सखाराम** : तुला हंसतांना पाहण्याचं माझ्या नशिबांतच नाहीं. चल विश्वनाथ ! ( आईच्या फोटोकडे पाहून जाऊं लागतो. )

**लक्ष्मी** : थांबा, थांबा हो मी रडत नाहीं ( रडत ) हंसतेंय मी—हंसतेय मी ! [ सखाराम शांतपणें एकदां लक्ष्मीकडे पाहून बाहेर जातो. ] थांबा ! या तुमच्या लक्ष्मीकडे एकदां तरी मागं फिरून पहा हो ! एकदां तरी मागं फिरून पहा ! [ विमल घाईनं येते. ती फार घाबरलेली आहे. ]

**विमल** : लक्ष्मी मी आलेंय !

**लक्ष्मी** : विमल !

**विमल :** काय केलं सखारामभाऊंनीं ? फौजदार व पोलीस कशाला आलेत ? काय केलं त्यांनीं ?

**लक्ष्मी :** त्यांनीं नाहीं, मींच त्यांच्याशीं दुष्टपणानं वागलें. ते मनानं फार मोठे आहेत. त्यांना मी ओळखूं शकलें नाहीं. त्यांच्या पायाजवळीहि उभं राहाण्याची माझी योग्यता नाहीं. मला ते हंसायला सांगत होते. पण मला हंसतां आलं नाहीं. विमल, ते येईपर्यंत मला मरूं देऊं नका. मला त्यांना हंसून दाखवायचंय. मला मरूं देऊं नका.

**बाबा :** लक्ष्मी—लक्ष्मी असं वेड्यासारखं काय बोलतेस ?

**लक्ष्मी :** मला तुम्हीं मरूं देऊं नका. मला त्यांना हंसून दाखवायचंय. त्यांच्याबरोबर मी हंसणार आहें. ( दुःखानं विमलच्या खांद्यावर मान ठेवीत.) विमल, त्यांच्याबरोबर मी हंसणार आहें. त्यांना सुखी करणार आहें—त्यांना सुखी करणार आहें. ( लक्ष्मी असं बोलत असतांना पडदा पडतो. )